# उमाजी नाईक

लेखक

विष्णु गणेश देशपांडे, वाई

'त्याग-सम्राट' (जयश्री),

'महासती वृंदा' इ. नाटकांचे कर्ते

रामकृष्ण बुक डेपो,

गिरगांव : : मुंबई ४

# नाट्यसरस्वतीच्या दरबारांत "उमाजी नाईक" ला साहित्यसम्राटाकडून मानाचें पान !

सुमारें शंभर वर्षांपूर्वी पुणें जिल्ह्यांत एक मोठा दरवडेखोर म्हणून जो उमाजी नाईक रामोशी प्रसिद्धीस आला, त्याचे पोवाडे पुण्यांत रस्तोरस्तीं ऐकूं येत असत. पण हल्लीं उमाजी नाईकांवर एका सुंदर नाटकाची रचना झालेली असून नूतन महाराष्ट्र मंडळीनें हें नाटक नीट बसवून रसिक प्रेक्षकांचें मनोरंजन करण्याचें श्रेय घेतलें आहे. नाटककर्ते रा. देशपांडे हे याच नाटक मंडळींतील एक अनुभविक नट आहेत. स्वतः नाटक मंडळींतील नटानें लिहिलेलें नाटक करून दाखविणें हा योग नाटक मंडळ्यांस क्वचित् येणारा म्हणून विशेष अभिमानास्पद होय . . . . . .

'उमाजी नाईक' हें नाटक लिहिण्यांत रा. देशपांडे यांनीं उच्च प्रतीचें रचनाचातुर्य दाखविलें आहे. प्रयोग सुमारें ४॥ तासांचा होऊनही त्यांत कंटाळवाणा भाग असा फारच थोड्या ठिकाणीं आढळतो. विनोदाकरितां म्हणून विनोद घातलेला नाहीं, व विनोद नसतांनाहि प्रयोग रंगतो हें विशेष आहे. प्रत्येक अंकाचा शेवट अद्भुतरीतीनें होतो व शेवटला प्रवेश तर इतका चांगला साधला आहे कीं, तसे शेवटचे प्रवेश फार थोड्या नाटकांत आढळतात. भाषा फारशी कृत्रिम नाहीं, परंतु कुणबाऊ व पांढरपेशी भाषांचें सरमिसळ मिश्रण झालेलें आहे. मनुष्यस्वभाव रंगविण्यांत बहुधा कोठेंही चूक झालेली नाहीं; इतकेंच नाहीं तर, कांहीं कांहीं स्वभावचित्रें रेखीव झालीं आहेत. पण नाटककाराचें सर्वांत अधिक कौशल्य उमाजी नाईक दरवडेखोर व त्याला पकडण्याला सिद्ध झालेले कंपनी-सरकार यांचे संबंध रंगविण्यांत दिसून येते, कां कीं राजकारण रंगभूमीवर सजविणें हें किंचित् नाजूक काम आहे. असें असतां, नाटककारानें उमाजीचा उमदा स्वभाव व ध्येयवादित्व हीं उज्ज्वल रंगवून त्याबरोबर इंग्रज लोकांचे व त्यांच्या राजनीतीचे गुणदोष मार्मिकपणें दाखविले आहेत.

. . . . . . राज्यकर्ते या नात्यानें इंग्रजांच्या स्वभावाचें नित्यस्वरूप, व स्वातंत्र्यप्रेमी पण कचाटींत सांपडलेल्या हिंदी प्रजाजनांच्या स्वभावाचें

नित्यस्वरूप, हीं दोनहि प्रस्तुत नाटककारानें यथार्थ दाखविलीं आहेत असें म्हटलें पाहिजे.

इतिहासदृष्ट्या हें नाटक सत्याला बहुधा धरूनच आहे. पण प्रेमाच्या व श्रीमंतीच्या पाशांत सांपडलेला जो उमाजी या नाटकांत दाखविला आहे तो, त्या बाजूपुरता खऱ्या इतिहासावर आधारलेला आहे असें वाटत नाहीं . . . या नाटकांतील उमाजी हा मूळ गर्भश्रीमंत व भरीत भर म्हणून बायकोच्या पैशानें झालेला श्रीमंत असें सर्वत्र दिसतें. त्याचा तेजस्वी स्वभाव व आवेश सर्वत्र प्रकट होतो ; पण परोपकारित्व कोठेंच दिसून येत नाहीं.

. . . . . . आम्हीं दाखविलेले हे दोष अर्थात सूक्ष्म नजरेचे आहेत. . . . सामान्यपणें उमाजी नाईक रामोशी दरवडेखोर याची जी कल्पना लोकांच्या मनांत वावरते ती कथानकानें व विशेषतः नैपथ्यविधानानें किंचित् ढळल्यासारखी वाटते, ती शक्य तर सुधारावी अशा हेतूनें हें दोषदर्शन सहेतुक केलेलें आहे. कलेच्या दृष्टीनें नाटक वाखाणण्यासारखें झालें आहे. पण सत्य हें जें नाट्यकलेचें प्रमुख अंग आहे तेंही सांभाळलें जाणें अवश्य आहे. तथापि एकंदरींत उमाजी नाईक या ‘ दिलदार दरवडेखोरा ’चें दुःखपर्यवसायी जीवित रा. देशपांडे यानीं आपल्या नाट्यकृतींत चांगलें चित्रित केलें आहे.

पुणें दि. १६ । १२ ।१९३४ — **न. चिं. केळकर**

# द्वितीयावृत्तीच्या पूर्वी

माझ्या ‘ उमाजी नाईका ’ नें त्याच्या जन्मापासून सर्व महाराष्ट्रभर दरबडे घातले आणि ‘ नूतन महाराष्ट्रा ’ला त्याच्या पडत्या काळीं धिरावा दिला त्यानें मनाचें बव्हंशी समाधान झालें ! परंतु त्यांतही साहित्यसम्राट कै. तात्यासाहेब केळकर यांच्यासारख्या रसिकवरानें अत्यंत चिकित्सक दृष्टीनें पुणें येथें त्याचा प्रयोग पाहून कॅप्टन मॅकिनटॉशच्या भूमिकेंत लेखक असतांना आपला भाग्यशाली वत्सल हात लेखकाच्या पाठीवरून फिरवला व आपल्या मनमोकळ्या अभिप्रायामध्यें मुक्तकंठ उत्तेजनपर आशीर्वादानें ज्यावेळीं लेखकाचें जीवाआगळें कौतुक केलें त्यावेळीं जी त्याला धन्यता वाटली ती त्याहीपेक्षां विशेषच होय. ‘ नूतन महाराष्ट्र ’ नंतर, नाट्यकलेच्या पडत्या काळांतही अमरावतीच्या विदर्भ नाट्य मंदिरासारख्या प्रथितयश नाट्यसंस्थेनें व इतर अनेक नाट्यसंस्थांनीं, तसेंच महाराष्ट्रांतील बहुतेक कंपन्यांनीं ‘ उमाजी नाईक ’ नाटकाचा यशोध्वज फडकत ठेवला याबद्दल लेखकाला धन्यता वाटत आहे. त्यानंतर उमाजी नाईकाची पहिली आवृत्ति संपली. पुस्तकाची मागणी चालूच राहिली आणि आतां या द्वितीयावृत्तीच्या प्रसंगानें मुंबईच्या रामकृष्ण बुक-डेपोचे चालक श्री. वि. र. बाम यांचा गोड ऋणानुबंध जुळून येऊन उमाजीची संपत्ति अगदी नव्या स्वरूपांत नाट्यरसिकांच्या ओटींत टाकण्याचा जो आनंदयोग त्यांनीं घडवून आणला त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. पण त्यापूर्वीहि माझें मन आदरभावानें जें उचंबळून येतें तें महाराष्ट्रांतील एका थोर प्रथितयश नाटयटीकाकार व लेखक श्री. शं. ना. काका सहस्रबुद्धे ( वाईकर ) यांच्यासंबंधानें. श्री. सहस्रबुद्धे हे आमच्या वाईचेच —अगदीं घराशेजारचेच. पण त्यांचा प्रत्यक्ष परिचय झाला तो आमच्या ‘नूतन महाराष्ट्र नाटक मंडळी’चे पहिले नाटककार म्हणून. या उमाजीच्या लेखनकार्योत त्यांची आत्मीयतेची फार मदत झाली आहे. अमरावतीच्या विदर्भ नाट्यमंदिरातर्फे उमाजी नाईकाचा प्रयोग करून अविस्मरणीय गौरवपर प्रसंग घडवून आणला तो त्या मंदिराचे चालक या नात्यानें श्री. काकासाहेब सहस्रबुद्धे यांनींच. त्याचप्रमाणें रामकृष्ण बुक-डेपोतर्फे

या द्वितीयावृत्तीचा सुयोग जुळवून आणला तोही उपरीनिर्दिष्ट श्री. काकासाहेबांनींच.

श्री क्षेत्र वाई
ज्येष्ठ शु. १ शके १८७७

कृतज्ञ लेखक
**विष्णु गणेश देशपांडे**

**विशेष लक्षवेध :** ‘ उमाजी नाईक ’ नाटकाच्या प्रयोगाचे व इतर सर्व हक्क सौ. लक्ष्मीबाई विष्णु देशपांडे, मधली आळी, वाई, जि. सातारा यांच्याकडे आहेत; त्यांच्या परवानगीशिवाय कोणी नाटकाचा प्रयोग केल्यास त्यावर कायदेशीर इलाज केला जाईल.

— ‘ उमाजी नाईका ’ चा कर्ता

सौ. मातोश्रीस —

आई, तुझ्या चित्ताकाशांत निराशेचा अंधार पसरला असला तरी मुखावर उत्साहाचें चांदणें आम्हांला दिसे. आज नाहींच, पण पूर्वींच्या कठीण परिस्थितींतही तुझा मुखचंद्र कधीं काळवं-डला नाहीं. आम्हा मुलांच्या सहनशक्तीला तूं कारण असून माझ्या प्रज्ञेला तुझ्याच स्फूर्तीचा आधार आहे. तुझ्या स्फूर्तिजीवनानें विकसित झालेलें हें नाट्य-पुष्प तुझ्याच चरणीं अर्पण असो !

तुझा

**बाब्या**

# आधींचे दोन शब्द

घरीं असतांना तीन चार नाटकें लिहिलीं. पण नाट्यतंत्राच्या प्रत्यक्ष ज्ञानाच्या अभावीं त्या नाटकांचें पुढें येण्याचें चिन्ह दिसेना. म्हणून दुर्दैवानें विश्वविद्यालयीन कोर्स घेण्यास मुकलेला मी नाट्यकोर्स घेण्याच्या विचारांत होतों. इतक्यांत 'बेबंदशाही' नाटक प्रसिद्ध झालें, व माझ्या आयुष्यक्रमांत प्रत्यक्ष संक्रमण करायला अर्थात मला नाट्यव्यवसायांत ओढायला वरील नाटकाची, गुरुवर्य श्री. अण्णासाहेब कारखानीस यांची प्रस्तावना कारण झाली. आपली नाट्यकृति 'महाराष्ट्र नाटक मंडळी' कडूनच रंगभूमीवर यावी अशी प्रस्तुत लेखकाची तीव्र इच्छा होती. परंतु दैवी इच्छा प्रतिकूल असल्यानें मनांतले विचार मनांतच राहिले याबद्दल अत्यंत वाईट वाटत आहे. १९३१ सालीं वरील आदरणीय संस्थेंतून 'नूतन महाराष्ट्र नाटक मंडळी' ही संस्था स्थापन होऊन त्याच वर्षी प्रस्तुत लेखकाचें 'त्यागसम्राट'—हल्लीचें 'जयश्री'—हें नाटक रंगभूमीवर आलें; व नंतर १९३३ सालीं 'उमाजी नाईक' हें द्वितीय नाट्यपुष्य रसिक प्रेक्षकांच्या सेवेला रंगभूमीवर येऊन आज पुस्तकरूपानें तें रसिक वाचकांच्या सेवेला सादर होत आहे.

प्रस्तुत कृति ही 'उमाजी नाईक' या दिलदार दरोडेखोराची करुण कहाणी आहे. ती सांगण्याकरितां तत्कालीन कॅप्टन मॅकिन्टॉश या थोर इंग्रज गृहस्थानें लिहिलेल्या उमाजीच्या चरित्राचा, त्याचप्रमाणें उमाजीच्या अनेक पोवाड्यांचा व दन्तकथांचा उपयोग लेखकानें केला असून, रुचेल त्या अल्पांशाचा रसिकांनीं स्वीकार करावा अशी विनंती आहे.

सोलापूर
भाद्रपद शु॥ ७
शके १८५६

सर्वांचा नम्र
विष्णु गणेश देशपांडे

“ उमाजी नाईक ” या नाटकाचा प्रथम प्रयोग **भुसावळ** मुक्कामीं ता. १३ जुलै १९३३ रोजीं झाला. त्यावेळीं ‘ **नूतन महाराष्ट्र नाटक मंडळीं** ’ तील खालील नटांनीं भूमिका केल्या होत्या.

| | | |
|---|---|---|
| उमाजी नाईक | .... | नटवर्य माधवराव टिपणीस |
| काळोजी | .... | श्री. दत्तोपंत प्रधान |
| कॅप्टन मॅकिन्टॉश | .... | श्री. पालकर |
| तात्याबा | .... | श्री. खांबेटे |
| गंगाराम | .... | श्री. गुप्ते |
| पुतळ | .... | श्री. रामभाऊ जोशी |
| जिजा | .... | नटवर्य पोतनीस |
| भिमा | .... | श्री. परुळेकर |

# अंक पहिला

## प्रवेश पहिला

[**स्थळ :—** पुणें प्रांतांतील डोंबवाडीच्या चावडीपुढील पटांगण. भिमा, तात्याबा व कित्येक स्त्रीपुरुष चावडीपुढें जमलेले असतात. एका सशस्त्र सोल्जरासह एक दवंडीवाला प्रवेश करतो. ]

**दवंडीवाला :** साहेब, चावडीचं तिकाटणं आलं.

**सोल्जर :** आच्छा, पुकारो.

**दवंडीवाला :** ( उंच स्वरांत दवंडी पुकारतो. ) ऐकाहो, ऐका. लोकहो, ध्यान देऊन ऐका. आज दुपारीं दोन प्रहरीं आपल्या वाडीवर उमाजी नायकाची स्वारी होणार आहे. ज्या कुणाला आपल्या जिवासह पैका आडका घेऊन दूर गांवीं अगर डोंगरांत पळून जायचं असल त्यांनीं आगाऊ तयारी करावी, आन् ज्या कुणाला उमाजीशीं दोन हात करायचे असतील त्यांनीं त्याला धैर्यानं तोंड द्यावं. कुंपणी सरकारच्या आन भोर सरकारच्या आज्ञेवरून जो कुणी उमाजीला जिवंत पकडून देईल त्याला दहा हजाराचा तोडा आणि सरकारांतून बहुमान मिळेल हो........

[अरे देवा, उमाजी... पळा... पळा...
असें म्हणत सर्व लोक पळून जातात.]

**सोल्जर :** ( दवंडीवाल्यास ) आच्छा, आगे चलो. ( दोघेही निघून जातात.)

---

## प्रवेश दुसरा

[**स्थळ :—** तात्याबाचें गरीबींतलें घर. तात्याबा व भिमा त्याची बायको प्रवेश करतात. ]

**भिमा :** अखेर आपल्या या डोंबरवाडीवरबी देवाचा कोप होनार ना ?

**तात्याबा :** व्हय, दुर्दैवानं तसा वंगळ परसंग आलाय खरा. कवा तरी हे संकट यायचं व्हतं तें आज येनार इतकंच. ईश्वरी विच्छा त्याला कोन काय करनार !

**भिमा :** पन आपल्या ह्या यव्हढ्याशा गरीब वाडीवर दरवडा घालून उमाजीला मिलनार तरी काय? नुसत्या मीठ भाकरीलाबी महाग असलेल इथलं लोक......अक्षी घरं धुवून काढलीं तरी गुंजभर सोनंबी मिळायचं नाहीं उमाजीला. बिचाऱ्या समद्या गांवकऱ्यांचा नाहक छळ व्हनार ना आतां!

**तात्याबा :** आग, दरवडेखोरासनी काय, जें सांपडल तेंच. ते कशापायीं दुसऱ्याच्या छळाची परवा करत्यात! त्यांतनं आपल्या विनामदारांचा वाडा हाय ना! त्या वाड्यावर ह्या भुतांची नजर असल. आपल्यासारख्या गरीबांकडनं त्यासनी जरी कायबी सांपडलं नाय तरी त्या वाड्यांत वचपा निघल. देशमुखांच्या शीरमंतीची निशानी असलेला त्यो कंठा...हाय ना... देशमुखांनीं लयी पिड्यापासनं संपादलेली संपत्ती दरवडेखोरासनी लुटाया मिळाली म्हंजे झालं.

**भिमा :** अर देवा, त्या चांडाळांची जर देशमुखांच्या वाड्यावर नजर असल तर पुतळाबाईची काय अवस्था होईल देव जाणे. बिचारीचा बापबी महिन्यापूर्वी वारला त्यें दूख वाइच कमी होतय त्योच हें अरिष्ट. बिचाऱ्या तरन्याताठ्या पोरीवर आनखी कसलं अरिष्ट न येवो म्हनजे मिळवलं. आपल्या कपाळीं काय काय ऐकायचं हाय त्यें त्या खंडोबारायालाच म्हाहीत.

**तात्याबा :** आग, कसला खंडोबा घेऊनशानी बसलीयास. त्यानंच तर उमाजीला दरवडे घालन्याची बुद दिली हाय ना? येळकोट मल्हाराच्या किरपेनं आपल्याला दरवड्यांत जय येतो असं तो म्हंतो. कसला येळकोट आन् कसलं काय, आपल्या या सातार जिल्ह्याचा, पुनें प्रांताचा आन् भोर इलाख्याचा येळकोट व्हायची येळ आलीया खरी. आतां त्योच आपला राजा होनार म्हननास. सगळ्या रयतेच्या तोंडचं पानी पळवलंय या खंडोबाच्या भगतानं.

**भिमा :** ऐकावं त्ये नवलच! दरवडेखोर आन् त्यो खंडोबाचा भगत.

**तात्याबा :** समदंच त्येचं चमत्कारिक. आन हो, त्या दरवडेखोराची स्वारी कशी होनार हाय त्यें तुसनी माहीत आहे काय?

**भिमा :** ती कशी?

**तात्याबा :** आग, एखाद्या राजावानी. खंडोबा देवाचा तो अवतारच म्हननास. आतां एखादी पिरतीची म्हाळसा गळ्यांत पडली बाबाच्या, म्हनजे

आकशी जेजुरीचा राजाच. सकाळींच भाऊ पाटलाला पुणंधारच्या छावणींतनं उमाजीची राजाच्या हुकुमावानी चिठी आलीया कीं, दोनपारचा दिवस होताच, चावडीवर मनभर भाकरीचं पीठ, तुरीची डाळ, गूळ, तूप, तेल अशा समद्या शिद्यासह बैठक घालून तयार रहा, न राहिल्यास बायलच्या अंगांवर पिनाऱ्या पोरासकट पाटलाची मुंडी उतरली जाईल.

**भिमा :** आग बायग! देवा, काय हा निर्दयपना! त्यो फार थोर मनाचा हाय असं पुतळाबाईकडनं आपण ऐकतों त्यें खोटंच तर. देवा नारायना, तूच आतां तारनार रे बाबा. पन खरंच का उमाजी नायकाचा असा निरोप आलाय?

**तात्याबा :** खर म्हंजी ही थट्टेची काय येळ हाय?

**भिमा :** मंग आतां हद्दच झाली म्हनायची! इतका जर उमाजी उघड उघड भर दिवसा दरवडे घालतोय, तर मंग कुंपणी सरकार मेलं कीं काय? जळलीं मेलीं हीं सरकारं! म्हनावं काल हथं सोजरं घेऊनशान आला ते आज कां नाहीं आला त्ये? आज दावा म्हनावं उमाजी नायकाला तुमचा पराकरम. रडा म्हनावं काय रडायचं त्ये म्हंजी आमचा छळ तरी होनार नाय.

**तात्याबा :** अग, त्या बिचाऱ्यासनी कां उगीच शिव्या? कुंपणी सरकारइकत चित्तुर सरकार समद्या प्रिथीमीतबी मिलनार नाय.

**भिमा :** मंग आतांच कुठं गेली त्येंची अक्कल, चोर यायच्या अगोदर गस्त घालायची, आन् चोर निघून गेल्यावर धावाधाव करायची कीं, त्ये कुठं गेलं म्हनून. ह्ये बघा आपन उमाजीलाच आतां आपला राजा समजूं. आतां त्यो कसला आटपतोय् सायबाला.

**तात्याबा :** हें बघ साहेबांनीं भोर सरकारच्या मदतीनं उमाजीला पकडण्याची लइ शिकस्त चालविली हाय; पन ह्या उमाजीम्होर चालतच नाहीं कुनाचं काय. उमाजी आला कीं, समद्यांची पांचावर धारन बसतीया. त्येला जर काय लवकर पायबंद बसला तर बरं, नाहींतर त्यो ममई बेटावरची तिझोरीबी लुटायला कमी करनार नाय.

**भिमा :** आन् मी म्हनत्ये, तसं व्हईल तर लइ बेस व्हईल.

**तात्याबा :** हें बग, त्येनं तिजोरी लुटली नाय असं नाय. तालुक्याच्या लानसान तिजोऱ्या त्येनं कितीदा तरी लुटल्या हाइती. आतां बड्या

साहेबाच्या नाकावर पाय ठेवूनशान ममई बेटावरची तिजोरी आन् भोरच्या पंतधन्यांच्या पागोट्यावरचा शिरपेच लांबवला म्हनजे आटपला कारभार.

**भिमा :** घ्या! यवढ्या मोठ्या कुंपणी सरकारची आन् पंतसाहेबांची ही यवस्था, तर मंग आपनासारख्या गरीबांचं काय चालनार त्या उमाजीम्होरं?

**तात्याबा :** आम्हीं त्यावनबी हाल्चाल केली असती, पन इकत्या गांव-कऱ्यांस्नी हत्यारं नगत का?

**भिमा :** अव, आपल्या देशमुखांच्या वाड्यांत हत्यारं हायत ना? तेवढ्यानं नाय का भागनार?

**तात्याबा :** पुतळाबाईनीं चावडीवर मंडळी जमवूनशान दरवडेखोरासनी हरकत करायचा इचार केल्याचं ऐकतों. पन तरुन उसळतं रक्त त्यें, नुसत्या अविचारी उसळीनं काय होनार, छे बोवा! मला तर ह्या धागदुंगीच्या जिन्याचा अक्षी कंटाळा आलाय, वाटतं उमाजीची चाकरी धरावी आन् घ्यावी करून आपली सुटका.

**भिमा :** व्हय तर काय! म्हंजी आपला छळ तरी होनार नाय.

**तात्याबा :** पन त्याच्या म्होरं जायचं कसं. तुरुत आपलं जीव कसं वाचत्याल त्यें अदुगर बघायला व्होवं. हिची भन दोन पारचा वखत आलाच कीं! आतां येतील ते दरवडेखोर.

**भिमा :** मंग आतां काय करायचं?

**तात्याबा :** काय करायचं! हें बघ तू बैस देवाच्या मागं लपून आन् मी गव्हाणींत गवताखालीं लपून बसतों. आपल्यावर त्येंची नजर गेली नाइ तरच आपली भेट. (पडद्यांत शिंगें, टाळ, ढोल इत्यादि वाद्यांचा आवाज व 'जय येळकोट मल्हार' असा जयघोष ऐकूं येतो.)

**तात्याबा :** हं आलेच त्ये आन् आपल्याच घरावर आले, चल, पळ पळ पळ.

[ दोघेही आंत जातात. काळूजी रामोशांच्या टोळीसह प्रवेश करतो. प्रत्येकाच्या कंबरेला तलवार, एका हातांत कुऱ्हाड व एका हातांत पलीता असून कांहींच्या जवळ दोरांचीं भेंडोळीं असतात. ]

**काळोजी :** (प्रवेश करीत असतां) जय येळकोट मल्हार! जय येळकोट मल्हार! कोण आहे घरांत? कुणी असाल तर ताबडतोब म्होरं या, आन् या

काळोजी नायकाम्होरं – उमाजी नायकाच्या सरदाराम्होरं – घरांत जें काय सोनं नाणं असल तें हजर करा. आपण होऊन पुढं न याल तर हा काळ्या तुम्हांसनी हुडकून काढल्याविना रहात नाहीं. विहिरी, भुयारं, बळदं, कणगी, गवताच्या गंजी, देवघरं, माजघरं...सगळ्या लपण्याच्या जागा आमच्या तोंडपाठ आहेत. मुकाट्यानं म्होरं या, नाहींतर प्राणाला मुकाल. जय यळकोट मल्हार!

**गंगाराम :** काळूबा, ह्या वाडींतले लोक मोठे बिलंदर दिसतात! उमाजी मामाचा तडाखा माहीत असून सोजरांच्या मदतीची वाट पाहाताहेत चोर.

**काळोजी :** पोरा गंग्या, तुझा मामा लइ मायाळू! अरे, दरवडेखोरीच्या कामांत दया, माया चालतीया व्हय! तुझ्या मामांच्या पोचटपणामुळंच तर हे गांवकरी लोक असा थेर करतात. पण आज म्हणावं ह्या काळोजीचा तडाखा आहे. पांच हजार रुपये ह्या वाडींतनं नाहीं वसूल झाले तर चहूंकडनं गांवाची शीव रोखून, देतों गांवाला आग लावून, मग बसा म्हणावं बोंबलत! अरे, पण अजून कुणीच कसं येत नाहीं. जा र, पिऱ्या, हऱ्या, मऱ्या, शिरा आतमंदी, आन् आणा बांधून समद्यांसनी माझ्याम्होरं! आम्ही पुढचीं दारं रोखून धरतों.

[ काळोजी व गंगारामाशिवाय सर्व धांवत आंत जातात. ]

**गंगाराम :** काळूबा, भोरच्या पंतधन्यांनीं उमाजीमामाला पकडण्यापायीं पलटण पाठविली, खरं का हो?

**काळोजी :** खरं तर! पण हें बघ पोरा गंग्या, हा काळोजी असल्यावर तुझ्या मामाचं कोण वाकडं करणार? काय करूं रे पोरा! रयतला छळण्याच्या आड तुझा मामा येतो, नाहींतर पंतधन्याला भोर सोडून पळायला लावलं असतं या काळोजीनं! आजच बघ तुझ्या आईला – जीजाला – तुझा मामा दिव्याला पोंचवायला जाणार असल्याची संधी साधून मी एकटा या मोहिमेवर आलों. आजच बघ ह्या लोकांना 'दे माय धरणी ठाय' करून उमाजी नाईकाच्या चौपट या गांवाचा वसूल करतों.

**गंगाराम :** हो पण, हें मामाला कळलं तर?

**काळोजी :** हंः! कोण जातयं त्याला कळवायला? आणि कुणी कळवलंच तर त्याची ह्या काळोजीशीं गांठ आहे. मुंडी मुरगाळून टाकीन. मी नाईकाच्या

हाताखालचा का होईना, पण एक प्रमुख नायक आहे. एखादे वेळीं मी माझ्या मनाप्रमाणं वाटेल तशी लूट केली म्हणून काय हरकत आहे! पोरा गंग्या, तूं मात्र माझ्याआड येऊं नकोस म्हनजे झालं. जें जें होईल तें तें बघ.

**गंगाराम :** काळुबा, मी कसा तुमच्या आड येईन? आज तुमच्या हाताखालीं मामांनीं आम्हांला पाठवलं आहे. समजा, आम्ही तुमच्या आड आलों आणि तें मामाला कळलं; तर लाडका भाचाबिचा न बघतां मुसकट रंगवील कीं मामा! मग जिजाआईकडंही बघणार नाहीं ती मधीं पडली तर. मला भय वाटतं तें इतकंच कीं, दिव्याचा रस्ता त्या डोंबवाडीच्या शिवेवरून जातोय. जातां जातां मामा इकडंच वळला तर...

**काळोजी :** वेड लागलंय तुला गंग्या! तुझी आई जिजाबाई बरोबर नसती तर नाईक इकडे वळला असता. पण तिला दिव्याला पोचवायचं सोडून इकडं गांवांत वाकडी वाट करून कशाला येतोय तो! त्यांतून त्या बहिणभावंडाचं असं कांहीं प्रेम आहे, कीं समद्या पृथ्वींतसुद्धां तसलं प्रेम सांपडायचं नाहीं. जिजीला – तुझ्या आईला माहेरपणाकरतां घरीं आणली कीं, नायकाला स्वारी-शिकार कायबी सुचत नाहीं. बहिणीची बडदास्त राखण्यापायीं झाडून साऱ्या नोकरांची तारांबळ उडालेली असते. केव्हां बहिणीचा नोकझोक ढळल आन् केव्हां थोबाडं फुटत्याल म्हणून सर्वांची पांचावर धारण बसलेली असते; असा बघ तुझ्या मामाच्या घरीं तुझ्या आईचा बडेजाव. तुझ्या आईचंबी आपल्या भावांवर बडं प्रेम. पोरा गंग्या, शेजच्या बायलनं नवऱ्याला यमाच्या घरनं सोडून आणल्याच्या कथा ऐकतों आपण पुराणांतून, पण बहिणीनं भावाला मरणाच्या दारांतून ओढून काढल्याचा मान पटकावणार गड्या तुझी आई.

**गंगाराम :** काळोबा, जाऊं द्या तें. माझ्या मामावर तो प्रसंग यायलाबी नको आन् माझ्या आईला तो मानबी मिळायला नको.

**काळोजी :** आहारे पोरा गंग्या, लेका इतका पोचटपणा शोभत नाहीं मर्दाला. आन् लेका उमाजीला मरण यायचं असलं तर तें टळणार आहे व्हय? लेका, रानोमाळ सोजर फिरत्यात, त्यांची कांहीं याद राख. साहेबाचा फांसा आहे तो.

**गंगाराम :** पण काळूबा...

**काळोजी :** बरं राहिलं. माझं म्हणणं इतकंच कीं, नाईक प्रेमाच्या बहिणीला दिव्याला पोचवायचं सोडून इकडं कशापायीं येतोय. आणि मी म्हणतों त्यांतून तो आलाही असता, पण आज त्याला दिव्याच्या शिवेवर साहेबाला भेटायला जायचं आहे ना पोरा! हें बग गंग्या, तुझी वेडी शंका आहे. आपल्याला अगदीं नंगा नाच करायला कुणाच्या बाचंबी भय नाहीं.

[ आंतून ओरडण्याचा आवाज, 'चल हो पुढं बऱ्या बोलानं' असें म्हणत रामोशी तात्याबास व भिमास ढकलत आणतात. ]

**पिऱ्या :** नाईक, हा चोर गवताच्या गंजींत आणि ही बया देवामागं दडून बसली होती.

**काळोजी :** काय रे, तुम्हांला पुढं बोलावलं तें ऐकूं आलं नाहीं? कुठं दडून बसला होतां? गवतांत आणि देवामागं! पाजी माणसं. आपण असं दडून बसलों म्हणजे कुणाला सांपडणार नाहीं असं तुम्हांला वाटलं होय, पण आतां कुठं जाल? अरे गवताची गंजच काय पण महापर्वतांत दडून बसलांत तरी हा काळ्या तुम्हांला हुडकून काढल्याशिवाय राहता ना. काय ग बया, आतां कोणाचा देव तुला पाठीशीं घालील? देवामागं दडून बसलीयास.

**भिमा :** बाबा रे, कुणालाबी आपला जीव प्यारा असतो. तुमच्या धास्तीनं आम्ही दडून बसलों ह्यांत आमचा काय बरं दोष?

**काळोजी :** काय दोष? काय दोष म्हणून धीटपणानं विचारतेस? सर्वस्वीं दोष, इतकंच काय पण ह्या काळोजीचा त्यांत भयंकर अपमान आहे. ह्या काळ्याचा एकदां हुकूम झाला कीं, कुणीही गांवकऱ्यानं हात जोडून ह्या काळ्यापुढं लोटांगण घालीत आलं पाहिजे. या काळोजीचं नांव ऐकलं कीं मोठमोठ्या सरदारउमरावांची पांचावर धारण बसते ह्याची कल्पना नाहीं तुम्हांला. एखाद्यावर मी दृष्टी वळवली कीं, माझ्या हातून त्याला सोडवण्याची कुणाची छाती आहे? त्या चांदीसोन्याच्या मूर्ती आपलं रक्षण करतील असं तुला वाटलं आणि क्षणांत ज्या गंजीची राख करतां येईल अशा त्या गवताच्या काड्या आपल्याला बचावतील, असं ह्या हरामखोराला वाटलं हाच तुमचा भयंकर गुन्हा आहे. पण लक्षांत ठेवा, त्या सोन्याचांदीच्या आणि तांब्यापितळेच्या मूर्तींना भट्टींत भाजायला आम्हां दरवडेखोरांना वेळ लागत

नसतो. आतां बऱ्या बोलानं असल नसल तें आमच्यापुढं आणून ठेवाल तरच अन्नानिशी जिवंत सुटाल. नाहींतर तुम्हां नवराबायकोला दोरखंडानं आवळून जिवंत जाळून टाकल्याशिवाय हा काळ्या रहात नाहीं. आणा काय असेल तें, आणा लौकर!

**भिमा :** काळूबा, कां उगीच आम्हां गरीबांसनी तरास देतां. तुम्हांसनी काय मिळल असं अगदीं समजूच नका. खळ्यावर भीक मागून कसा तरी अर्धा कच्चा घास खानार आम्ही, आमच्याकडनं तुम्हांला कायबी मिळनार नाय.

**तात्याबा :** कुणी श्रीमंत माणसं असतील तर...

**काळोजी :** चूप बैस! कुणाकडून काय मिळवायचं ही अक्कल तूं आम्हांला शिकवूं नकोस. ह्या वाडींत कुठं कुठं हात मारायचा तें आम्हांला चांगलं माहीत आहे, अन् त्याप्रमाणं आम्हीं गांव धुऊन काढणारच आहोंत. तुमचा तो देशमुखांचा वाडा आम्ही विसरलों नाहीं. ती देशमुखांची पोर पुतळ, चावडीवर गांवकऱ्यांना जमवून आम्हांला पिटाळून लावण्याचा बेत करीत होती नाहीं! आतां कुठं गेली ती?

**भिमा :** त्या थोरामोठ्यांच्या गोष्टी आम्हांला काय माहीत? काळूबा, आम्ही आपली गरीब माणसं, आम्ही आमच्यापुरतंच पाहणार!

**काळोजी :** बस्स तर मग. काढा काय असेल तें, काढा लौकर; नाहींतर पुढचे भयंकर परिणाम भोगायला तयार व्हा!

**भिमा :** नाईक, एकदां तुम्हांसनी सांगितलं तेंच खरं हाय. आम्हां गरीबांच्या घरांत काय असनार?

**काळोजी :** तुम्ही दिसायला गरीब दिसणारे लोकच बडे बदमाष असतात. पैका पुरून ठेवायचा आन् आमच्यापुढं नुसते दांत वेंगाडायचे. पण लक्षांत ठेवा, लपून ठेविलेलं डबोलं न द्याल तर दांतही पाडायला आम्ही कमी करणार नाहीं. आणा लौकर काय असेल तें!

**भिमा :** काळूबा, तुम्हांला किती परोपरीनं सांगितलं कीं, आमच्याजवळ कायबी नाय म्हणून. तुम्ही कायबी केलंत तरी आमच्याकडनं तुम्हांसनी कायबी मिळायचं नाय.

**तात्याबा :** काळूबा, कांहीं नाहीं तिथं काय देणार ?

**काळोजी :** कसं देत नाहीं तेंच मी पहातों. पण अजून विचार करा. माझा हात तुमच्यावर पडला नाहीं तोंवर तुमच्या गमजा आहेत. एकदां का आमच्यांत पिशाच्च्यांचा संचार झाला कीं, मग तुम्ही आपसूक कबूल व्हाल.

**भिमा :** इकतही सांगून तुम्ही ऐकतच नाय तर मंग आमच्यावर देवच कोपला म्हनायचा. काय पूर्वजन्मींचं पाप आमच्या वांट्याला आलं असल त्येचीं फळं आम्हांसनी भोगायलाच होवींत. पावसानं झोडलं आन् राजानं मारलं, त्येची दाद कोन घेनार. काळूबा, आजकाल तुम्ही आन् तुमचा नाईक त्यो उमाजी...तुमीच आमचं राजं आहांत. काय करायचं असल त्ये करा. पैशापायीं प्रान घेतलांत तरी तुमचं आम्ही काय करनार !

**काळोजी :** ( तात्याबास ) काय रे, तुझीही या बयेच्या म्हणण्याला संमती आहे का ?

**तात्याबा :** इकतही सांगून तुम्ही ऐकत नाहीं तर मंग संमती न देऊन काय करूं नाईक ?

**काळोजी :** ठीक आहे. व्हा तर मरायला तयार. कोण आहे पिऱ्या, हऱ्या, कऱ्या !

**तिघेही :** जी.

**काळोजी :** पेटवा पलीत. आन् या हट्टी नवराबायकोच्या अंगाला चिंध्या गुंडाळून त्यावर तेल ओता, आन् द्या पलीत्यानं येळकोट मल्हार करून.

[ रामोशी तात्याबाच्या व भिमाच्या अंगाला चिंध्या गुंडाळूं लागतात, इतक्यांत पुतळ प्रवेश करते. ]

**पुतळ :** ( प्रवेश करीत असतां ) हां खबरदार. चांडाळांनो, विझवा ते पलिते.

**भिमा :** कोण पुतळाबाई ! आन् अशा वक्ताला इथं ?

**काळोजी :** कोण ग तूं ? इतकी तालवार हुकूम करणारी कोण आहेस ग तूं ?

**गंगाराम :** काळूबा, ती देशमुखांची पोर पुतळ पुतळ म्हणत्यात ती हीच दिसती जणूं !

**पुतळ :** होय ! तीच मी. देशमुखांची पुतळ म्हणतात ती मीच.

**काळोजी :** आम्हांला धरायला आलीस व्हय. अगदीं धन्यावानी पलीत विझविण्याचा हुकूम केलास कीं ? तुला काय आम्ही तुझे नोकर वाटलों व्हय बया ?

**पुतळ :** दुसऱ्यांच्या पैशावर आन् अब्रूवर दरवडा घालणारे तुम्ही, तुम्हांला कसली आली नोकरी. भुरटे, चोर, दरवडेखोर.

**भिमा :** पुतळाबाई, तुम्ही कशापायीं या संकटांत उडी घेतांया ? उमाजीला आजवर तुम्ही लइ नांवाजत व्हतांना, त्येंच्याच दूतांचा हा धिंगाना तुम्ही सोताच बगा म्हंजे झालं. अहो, यांच्यासंग बाचाबाची करून का काय उपयोग होनार हाय ? आम्ही कितीतरी त्येंची सारखी विनवनी करतों हाव, पन यांच्या फत्तरावानी हृदयाला काय पाझर फुटत नाय. मी म्हंत्ये आमचं काय व्हायचं असंल त्ये व्हइल, तुम्ही कशापायीं आपला जीव धोक्यामंदी घालतांया ?

**पुतळ :** कशाला म्हणजे ? माझ्या वाडीवर ह्या चांडाळांनीं दरवडा घातलेला दिसत असतां, तुमचे हाल माझ्याच्यानी कसे पाहवतील ? काळोजी, उमाजी नाईक असहाय्य गरीब लोकांना कधींही छळत नाहीं, असं मी ऐकलं आहे. मुकाट्यानं तुम्ही येथून चालते व्हा !

**काळोजी :** अरे वा ! उमाजी नायकाच्या नांवानं आम्हांला दबवण्याचा तुझा विचार आहे होय ? पण हें बघ मी त्याच्या बरोबरीचा नायक आहे. मी काय वाटेल तें करीन. नायकाच्या आधाराची लुडबुड तूं उगीच करूं नकोस.

**पुतळ :** उमाजीच्या धास्तीनं तुम्ही ऐकत नाहीं तर नका ऐकूं. कांहीं असलं तरी ही पुतळ तुम्हांला तुमच्या कामांत अडथळा केल्याशिवाय राहणार नाहीं.

**काळोजी :** आन् काय करनार ग तूं ? आमच्या हातून वाडीकरांसनीं वाचवणार व्हय ? अग, ओठ पिळला तर दूध निघल कीं ओठांतून, आन् आव आणलया म्हशासुरमर्दिनीचा.

**पुतळ :** होय ! तुमच्यासारख्या उन्मत्त रेड्यांना तोडायला जगदंबा माझ्यासारख्या कोवळ्या पोरींतही संचार करिते समजलांत ? तुम्हांला वाटत असेल कीं ही बाईमाणूस काय करणार म्हणून ? पण ह्यांच्या अंगाला हात

तर लावा, प्रत्येकाच्या अंगांतून रक्ताचे पाट नाहीं वाहायला लावले तर क्षत्रिय कुलांत मी फुकट जन्मलें असं होईल.

**काळोजी :** व्हय, व्हय. दिसतोय तुझा पराकरम, पण तूं अगोदर इथं कशाला आलीस मरायला ? तुझ्या वाड्यावर आम्ही येणार आहोंत तेव्हां दाव ना तुझा पराकरम. आम्ही इथं काय वसूल मिळतो तो घेऊन तुझ्याच वाड्यावर येणार आहोंत, मग पाहूं तुझा काय पराकरम असल तो.

**पुतळ :** मग कशाला ! चला आतांच वाड्यांत. पाहातेंना कशी कपर्दिक तुमच्या हातीं लागते ती. वाडा पेटवून दिलांत, अगदीं पाया खणून काढलांत तरी माझ्या संपत्तींतील एक कवडीही तुमच्या हातीं लागणार नाहीं. त्यांतून तुमची घमेंडच असेल तर आधीं वाड्यांत चला. इथं या गरीब लोकांचा छळ करून, चांडाळांनो, तुम्हांला कांहींएक मिळणार नाहीं, समजलांत ?

**काळोजी :** कांहीं मिळतं कीं नाहीं हें बघायला आमचे आम्ही पूर्ण मुखत्यार आहोंत. तूं उगीच वटवट करूं नकोस. तुझ्या वाड्यावर तर आम्ही येणारच, पण त्या आधीं या वाडींतील घर अन् घर टिपून काढल्याशिवाय आम्ही राहणार नाहीं. हं पिऱ्या, हऱ्या, मऱ्या, पकडा ह्या नवराबायकोला, आणि द्या पलीत्यानं यळकोट मल्हार करून !

[ रामोशी पुढें सरसावतात तोंच – ]

**पुतळ :** ( तलवार उपसून ) एक केसभर पुढें सरकाल तर प्रत्येकाच्या शरीराच्या चिंधड्या उडल्या जातील, लक्षांत ठेवा ! या गरीब नवराबायकोला अन् माझ्या वाडीकरांना वांचविण्याचा मीं निश्चय केला आहे, तुम्हांला त्यांचा जर छळ करायचा असेल तर अधीं या पुतळच्या तलवारीशीं झुंजायला तयार व्हा.

**गंगाराम :** काळूबा, ही पोर मोठी जहांबाज दिसते.

**काळोजी :** असूं दे रे ! काय करते ती आपल्या म्होरं ! कोंवळ्या काकडीसारखी फोडायची झाली तर असल्या पन्नास पोरी पुरायच्या नाहींत आपल्याला. पुतळ, बऱ्या बोलानं दूर हो, नाहींतर तूं आपली विटंबना करून घेशील !

**पुतळ :** ह्या माझ्या लोकांची विटंबना होण्यापेक्षां स्वतःची विटंबना होऊन प्राण गेला तरी बेहत्तर !

**काळोजी :** पोरटे, बाजूला हो. नाहींतर तुझ्या वाड्यांतल्या संपत्तीबरोबर ही तुझी नवतीची उतूं चाललेली संपत्ती लुटायला आम्ही मागं पुढं पाहणार नाहीं, ध्यान राख !

**पुतळ :** तुमच्या नीचपणाची मजल कुठवर जाईल ह्याची मला कल्पना होतीच. पण लक्षांत ठेवा, या गरीब नवराबायकोचं रक्षण करीत असतां माझ्यावर तसा कांहीं प्रसंग आलाच तर ही पुतळ तुमच्या हातीं जिवंत सांपडणार नाहीं.

**भिमा :** पुतळाबाई, तुम्ही कशापायीं बरं या संकटांत पडताया ? आम्हांसनी छळून त्येसनी काय मिळायचं असंल त्ये मिळूं द्या.

**तात्याबा :** पन, तुम्ही आमच्या पायीं आपल्यावर संकट ओढून घेऊं नगा.

**पुतळ :** तुम्ही स्वस्थ असा. पाहतेंच मी हे चांडाळ काय करतात ते !

**काळोजी :** आम्ही काय करतों तें तुला पहायचंय ?

**पुतळ :** होय !

**काळोजी :** ठीक आहे तर ! गंग्या, पिऱ्या, हऱ्या, धरा या पोरीला. पाहतां काय ? ( गंगारामशिवाय सर्वजण पुतळीशीं लढूं लागतात. ती पिऱ्याला लाथ मारून खालीं पाडते. ) पिऱ्या हलकटा, पडलास काय ? थूः तुझ्या जिनगानीवर लेका ! रामोशाच्या कुळांत आलाया. थूः तुझ्या जिनगानीवर लेका ! आतां मीच हिला पकडतों बघ. पुतळ, आतां बघतों हां, तुझी तलवार कशी आहे ती ! ( लढूं लागतात. इतक्यांत उमाजी आपल्या बहिणीसह प्रवेश करतो. )

**उमाजी :** हं ! काळोजी, हात आवर. ( 'जय यळकोट मल्हार' असा जयघोष करून सर्वजण उमाजीला मुजरा करतात. )

**पुतळ :** ( क्षणभर उमाजीकडे शांतपणें पाहून ) काय हा उमाजी ? आणि दरवडेखोर ?

**उमाजी :** काळोजी नाईक, काय कामगिरी चालविली आहे तुम्ही ?

**काळोजी :** ( स्वगत ) नाईक आलाच शेवटीं ! प्रकरण अंगावर बेतणार !

**उमाजी :** काळोजी ! काय करीत होतास ?

**काळोजी :** ( मुजरा करून ) हुकमाप्रमाणं ह्या वाडीची झडती घेत होतों नाईकसाब !

**उमाजी :** झडती ! वाडीची झडती ! कुणाच्या हुकमानं तूं वाडीची झडती घेत होतास ?

**काळोजी :** आपल्या हुकमानं नाईकसाब !

**उमाजी :** माझ्या हुकमानं ? काळोजी, तूं शुद्धीवर आहेस का ? कसला कैफ तर केला नाहींस ? वाडींतील लोकांना छळण्याचा माझा तुला हुकूम होता ?

**पुतळ :** माझ्या वाडींतल्या गोरगरीबांना वांचवायला प्रत्यक्ष मल्हारीच अवतरला नाहीं ना ?

**उमाजी :** कसला कैफ केला आहेस काळोजी ?

**काळोजी :** नाहीं धनी ! कैफ करून आपल्या रागाला बळी पडण्याची हौस का आहे या काळोजीला !

**उमाजी :** तशी हौस नसती, तर वाडींतल्या या गरीब लोकांच्या वाटेला तूं गेलाच नसतास ! काळोजी, नीट शुद्धीवर ये, आणि माझ्या सवालाला नीट अकलेनं जबाब दे. माझा तुला काय हुकूम होता ? या वाडींतल्या कंगालांना छळून त्यांचीं घरं लुटण्याचा माझा तुला हुकूम होता ? बोल, बोल लवकर ! कां ? तोंड उघडत नाहीं ? ( गंगारामास ) गंग्या, काय करीत होती तुमची टोळी ? कसला हुकूम होता तुम्हांला ?

**गंगाराम :** सगळा गांव लुटायचा हुकूम नव्हता, पण आम्ही......

**उमाजी :** तुम्ही तो लुटणार होतां. इतकंच काय, पण ह्या उमाजीच्या आगतस्वागताकरितां दहापांच घरांना आगी लावून निरपराधी अशा दहा-पांच लोकांचीं प्रेतं पाडून ठेवलींत, आणि ह्या माणसांचीही तीच अवस्था करणार होतां, असंच कीं नाहीं ?

**गंगाराम :** ( अडखळत ) होय मामा !

**उमाजी :** होय मामा ? होय म्हणून म्हणायला शरम नाहीं वाटत ? पाजी हरामखोर ! कुत्ते ! लाथेनं थोबाडं फुटलीं नाहींत तोंवर तुमचे हे थेर चालतील ! बेअकली डुकरं नाहींतर !

**गंगाराम :** मामा ! ह्या आपल्या गंग्यावर रागावूं नका. आपला हुकूम तोडून आम्हीं वाडी लुटली नसती, पण काळोजी नायकाच्या हुकमापुढं आम्ही काय बोलणार ? वरिष्ठाचा हुकूम न मानावा तर आपण कडक शिक्षा करणार !

बरं मानावा तर लोकांना छळावं लागणार ! आपल्या धास्तीनं आमच्यापैकीं एकानंही नायकाविरुद्ध ब्र काढला नाहीं.

**उमाजी :** अस्सं. एकूण या सर्व प्रकाराला हा काळोजी कारण आहे तर ! अरेरे, काय करूं ? अंगाची कशी आग आग होऊन गेली आहे ! काळ्या, हरामखोरा ! माझ्या नांवाला काजळ फांसण्याचा तूं उद्योग चालवला आहेस काय ? पण याद राख, गाढवावरून धिंड काढून तुझी खांडोळी केल्याशिवाय मी आतां स्वस्थ रहात नाहीं. ह्या उमाजीला दरवडेखोर, बंडखोर म्हणवून घेण्यांत अभिमान वाटत असला, अन्यायानं मिळवलेली दुसऱ्याची संपत्ती त्याच रीतीनें पण छातीठोकपणानं लांबवण्यांत आनंद वाटत असला, तरी गोरगरिबांना नाहक छळणाऱ्याची मुंडी पायांखालीं ठेंचण्याचं त्याचं बीद आहे हें, काळ्या, तूं विसरलास काय ? काळोजी, अंगार, अंगार लावलास माझ्या अंगाला. काळोजी, आतां तुला काय करूं रे, अर्धा कच्चा खाऊन टाकूं, का ह्या तलवारीनं तुझीं हाडं फोडून तीं कोल्ह्याकुत्र्यांपुढं फेंकून देऊं ? काय करूं बोल ?

**जिजाबाई :** ( पुढं होऊन ) दादा, दादा, शांत हो ! बोलूनचालून दुसऱ्याकडून पैसे लुटण्याचा आपला धंदा ! जरा कुठं काळोजीच्या हातून अन्याय झाला असला तर त्याबाबत इतकं कांहीं संतापायला नको ! लोकांच्याकडून पैसा काढायचा तो त्यांना जरा धाकदपटशा दिल्यावांचून कसा मिळेल ?

**उमाजी :** जिजे, तुझं खरं आहे. धाकदपटशा दिल्याशिवाय पैका काढतां येणार नाहीं हें जरी खरं असलं, तरी तो पैका मिळविण्याची माझीं कुळं अगदीं निराळीं आहेत. दरवडेखोरांच्याच घरांवर हा उमाजी दरवडे घालीत असतो ! वाघाच्या गुहेंत शिरून त्याला तिथून धुडकावून देत असतो. पण असाहाय्य लोकांना हा उमाजी कधींही गांजीत नाहीं. त्यांचा पैका हा उमाजी शिवनिर्माल्य समजतो, हें तूं विसरूं नकोस !

**जिजा :** तें सगळं खरं; पण एखादे वेळीं चूक होतेच माणसाकडून. म्हणून इतकं कांहीं संतापायचं कारण नाहीं.

**उमाजी :** कारण नाहीं ? अलबत कारण आहे ! ह्या काळोजीला आज मी देशमुखांच्या वाड्यावर पाठविला होता. माझा हुकूम तोडून त्यानं गांव लुटण्याचा घाट घातला. शिस्त मोडून त्यानं माझा भयंकर गुन्हा केला आहे,

आणि ह्या त्याच्या गुन्ह्याबद्दल मी त्याला पुरेपूर मोबदला दिल्याशिवाय राहणार नाहीं. बोल! काळ्या, तूं माझा हुकूम कां मोडलास? मुकाट्यानं जाब दे, उघड तोंड, नाहींतर डोळ्याच्या एका खुणेबरोबर तुझीं आंतडीं लोंबूं लागतील!

**जिजा :** काळूजी, आतां स्वस्थ बसून कसा निभाव लागेल! दादाच्या शिस्तीची कदर तुम्हांला माहीत असतांना कशाला त्याचा हुकूम मोडलांत? वेळवखत असतो, एखादेवेळीं प्राणावर बेतली तर कसं होईल बरं!

**उमाजी :** एखादेवेळीं कशाला, आतांच त्याच्या प्राणावर बेतली आहे. माझ्या सैन्याच्या शिस्तीविरुद्ध वर्तन केलं म्हणजे काय मोबदला मिळतो हें या सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांत प्रत्येकाला कळलंच पाहिजे. काळ्या, चल हो मरायला तयार! तूं ह्या गरीबांना जाळणार होतास नाहीं का? ठीक आहे. तर मग जळून मरण्याच्या यातना मी आतांच तुला भोगायला लावतों.

**जिजा :** काळोजी, कराना आपला अपराध कबूल! उगीच कां प्राणाला मुकतां? माणसाच्या हातून चूक होत कां नाहीं? अपराध कबूल करा, आणि दादाची माफी मागून मोकळे व्हा कसे.

**काळोजी :** (स्वगत) कसं तरी करून वेळ मारून नेली पाहिजे!

**जिजा :** काळोजी, तुम्हांला स्वस्थ तरी कसं राहवतं! तुमच्या प्राणावर बेतलेली पाहून माझा जीव कसा खालवर होऊं लागला आहे! दादाचा राग अनावर असतो, उगीच त्याच्या कोपाला बळी कां पडतां? काळोजी! मागा, मागा म्हणतें ना माफी!

**उमाजी :** जिजे, तूं माझ्या शिस्तीच्या कामांत उगीच ढवळाढवळ करूं नकोस. जा मुकाट्यानं, तूं आपल्या मेण्यांत जाऊन बैस. ह्या हरामखोराला मातींत मिसळून मी तुझ्या मेण्याकडे आलोंच म्हणून समज. जिजा, जा तूं येथून मुकाट्यानं!

**पुतळ :** वीरसिंह, मधेंच बोलतें, क्षमा करा. कशाला मारता या मेलेल्याला? आपल्या बहिणीच्या सांगण्याप्रमाणं काळोजीला सोडून द्या.

**उमाजी :** (पुतळकडे क्षणभर शांतपणें पाहून) माझ्या कर्दनकाळ काळोजीशीं दोन हात करणाऱ्या वीरस्त्रिये, तूं कोण आहेस?

**भिमा :** नाईक ! ही देशमुखांची मुलगी ! पुतळाबाई यांचं नांव ! नाईक, काळोजीनं आमचा छळ केला खरा, पण त्याला मारूं नये असं आम्हांसनीबी वाटतं.

**उमाजी :** माझी माय ! तुमच्या त्या वाटण्याचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं ! कडक शिस्त हाच माझा प्राण आहे. शिस्त असल्यावांचून या हरामखोरांना जरब बसायची नाहीं. माझा दरवडेखोराचा पेशा असला तरी तुमच्यासारख्या अनाथांना न गांजण्याची मी माझ्या लोकांना सक्त ताकीद दिली आहे. उमाजी स्वतःला शेर समजतो. ह्या उमाजीच्या मनगटांत बळ असलं, तर तो टोपीवाल्या इंग्रजाला क्षणोक्षणीं नमवील. ह्या उमाजीला मान पाहिजे असला तर भोरच्या पंतधन्याला शौर्याचा मुजरा ठोकून त्यांच्याकडून तो आपलं हक्काचं शेलापागोटं मिळवील. पण हीं असलीं नादान कृत्यं तो प्राणांतींही करणार नाहीं. आणि जर कोणी करील तर त्याला लाथेखालीं तुडविल्याशिवाय राहणार नाहीं.

**तात्याबा :** नाईक, हें अगदीं बरोबर आहे बघा, चांगला ठोका या हरामखोराला. मघाशीं मारक्या खोंडावाणी उधळत होतास नाहीं ?

**जिजा :** गप बैस रे ! तुला नाहीं विचारलं कुणी ! ( काळोजीस ) काळोजी, किती विनवण्या कराव्या तुम्हांला ! तुमचा जीव चाललेला माझ्याच्यानं पहावत नाहीं ! उमाजी, तुम्ही व मी एके ठिकाणीं वाढलों. तुमच्यावरील दादाच्या रागानं माझ्या अंगाचं पाणी पाणी झालं आहे ! मागा – मागा ना माफी दादाची !

**काळोजी :** ( स्वगत ) आतां माफीशिवाय सुटका नाहीं.

**जिजा :** काळोजी, माफी मागायला किती वेळ लावतां आहांत !

**काळोजी :** नाईक, हा वेळपर्यंत मी बोललों नाहीं ! – पण मला माफ करा ! मीं आपला भयंकर अपराध केला आहे, पण मला मारूं नका ! मी तुमच्या पायां पडतों ! मला क्षमा करा !

**उमाजी :** कशाला पायां पडतोस, कुणाच्या पायां पडतोस, आन् कसली माफी मागतोस ? मागं मीं तुला एकदां माफी दिली होती ! मी आतां तुला ठारच करणार !

**जिजा :** दादा, किती हट्टी आहेस तूं! कर ना क्षमा काळोजींना! एकद त्यांनीं माफी मागितल्यावर–

**उमाजी :** चल हट बाजूला! तुझ्या सांगण्याचा कांहींएक उपयोग होणार नाहीं.

**जिजा :** ( गुडघे टेकून ) दादा, मी तुझ्या पायां पडतें, पदर पसरतें, पण तूं काळोजींना मारूं नकोस. माझ्याकरतां, तुझ्या लाडक्या जिजीकरितां तरी तूं यांना क्षमा कर. आजपर्यंत तूं माझा शब्द मोडला नाहींस; मग, आजची ही माझी विनवणी तूं पायाखालीं तुडवणार होय, दादा!

**उमाजी :** जिजे, कसला वेडा हट्ट धरतेस तूं! या तुझ्या हट्टानं माझी शिस्त बिघडविण्याचा का तुझा विचार आहे?

**जिजा :** तें कांहीं मी जाणत नाहीं! तुला खंडोबारायाची शपथ आहे. दादा, जर तुला शपथ मोडून काळोजीचा प्राणच घ्यावयाचा असला, तर तुझी ती तलवार आधीं या तुझ्या पाठच्या बहिणीच्या पोटांत खुपस, आणि मग काळोजीचं काय करायचं असल तें कर!

**उमाजी :** माझी माय, भलताच प्रसंग आणलास तूं या उमाजीवर! माझ्या मल्हारीची शपथ मोडून आन् तुझ्या काळजांत तलवार खुपसून मी काळोजीला मारूं म्हणतेस? जिजे, फार वाईट वेळ आणलीस बघ या उमाजीवर.

**जिजा :** तूं कांहीं म्हण, पण मला एवढी भीक घाल.

**उमाजी :** ही तुझी चांगली भीक आहे! पण...काय करूं?...ऊठ जिजा, काळोजीच्या आयुष्याची दोरी तुझ्या रूपानं ताठ उभी राहिली बघ माझ्या मार्गात!

**काळोजी :** ( उठत असतांना स्वगत ) होय! आणि आतां ह्याच दोरीचा गळफांस करून तुझा गळा आवळल्याशिवाय हा काळूजी आतां रहात नाहीं!

**जिजा :** दादा, तूं कांहीं म्हण! मला चार शिव्या दे........

**उमाजी :** मी कांहीं म्हणत नाहीं आणि तुला शिव्याही देत नाहीं. मी तुझं ऐकतों, पण तूं आतांच्या आतां मेण्यांत जाऊन बैस. ह्या काळोजीला मी जिवंत ठेवणार असलों तरी तो माझ्या हातून अगदींच सुधा सुटणं शक्य नाहीं. तूं चालती हो इथून! गंग्या, धर तिचा हात आणि घेऊन जा तिला.

( गंगाराम तिला घालवूं लागतो. )

**जिजा :** दादा, कांहीं कर; पण काळूजीच्या जिवाला धक्का लावूं नकोस. ( जाते. )

**उमाजी :** पिऱ्या, हऱ्या, कऱ्या, बघतां काय? पकडा या हरामखोराला! आणि ज्या हातानं हा मघाचं क्रूर कृत्य करीत होता, त्या हाताचीं बोटं माझ्या-देखत चेंचून त्याचा खिमा करा! धरा! पकडा हरामखोराला! पाजी, हरामखोर.

[ उमाजीचे सर्व लोक काळोजीस पकडतात व जवळच असलेल्या दगडी चौथऱ्यावर त्याचे हात ठेवून बोटें ठेंचतात. काळूजी 'मेलों' 'मेलों' असें ओरडतो. ]

**काळोजी :** ( सुटका झाल्यावर ) नाईक, हा तुमचा अविचार झाला आहे. मी इतका वेळ कांहीं बोललों नाहीं. हा काळोजी आज तुमच्या हातांत सांपडला आहे खरा, पण ह्याचा सूड घेतल्याशिवाय मी रहाणार नाहीं.

**उमाजी :** चल, भेकड कुत्र्या! मिळालं तेवढं शासन कमी झालं वाटतं? माझ्या जिजीच्या शब्दांत जर मी सांपडलों नसतों तर आतां तुला इथून जिवंत सोडलाच नसता. पण जा, मी तुला क्षमा करतों. चल, चालता हो इथून! पिऱ्या, लाथ मार त्याच्या पेकाटांत!

[ पिऱ्या काळोजीला गचांडी देऊन घालवितो. ]

**काळोजी :** ( स्वगत ) साहेबाच्या मदतीनं आतां याचा कांटा काढीन तरच नांवाचा काळ्या. ( जातो. )

**गंगाराम :** मामा, ह्या काळोजीला आपल्या सैन्यांतून हाकललांत हें बेस झालं; पण त्याला सोडून दिलांत हें मात्र कांहीं बरं केलं नाहींत.

**उमाजी :** जिजाकरतां! पोरा, पाठच्या बहिणीकरतां!

**गंगाराम :** प्रेमाची बहीण असली तर तिची उठबस घरीं. आपल्या आज-पर्यंतच्या शिस्तीला तुम्हीं स्वतःहून हा अपशकून करून घेतलांत मामा!

**उमाजी :** बरं गंग्या, काळूजीच्या जागीं आजपासून मीं तुला ह्या टोळीचा नायक केला आहे; पण याद राख, काळोजीसारखं माझं नांव बद्दू करायची वेळ आणलीस, कांहीं कमीजास्त दिसलं, तर बिलकुल दयामाया न करतां मुसकट फोडून टाकीन – ध्यानांत ठेव!

**गंगाराम :** जी! (गंगारामासह त्याच्या टोळींतील सर्व लोक मुजरा करतात.)

**उमाजी :** जा तर, आपल्या सर्व लोकांना एके ठिकाणीं जमवून देशमुखांच्या वाड्यावर मोर्चा वळवा. कुणालाही मारहाण न करतां जामदारखान्याच्या किल्ल्या जर मिळाल्या नाहींत तर वाड्याला आग लावून द्या, पाणी लागेपर्यंत वाड्याचा पाया उखडून काढा. देशमुखांनीं कित्येक शतकं अपहार केलेली लोकांची संपत्ती आजच्या आज ह्या उमाजीच्या जामदारखान्यांत पोचलीच पाहिजे. लुटारूंची संपत्ती आज हा उमाजी लुटून नेणार. चला, कामाला लागा.

[गंगारामाशिवाय टोळींतले लोक निघून जातात.
गंगारामही जाऊं लागतो, इतक्यांत...]

**पुतळ :** पण, नाईक, देशमुखांच्या वाड्यांत आहे कोण तुम्हांला अडथळा करायला? वाड्यांत एकही डोकं नाहीं. तुमची स्वारी होणार हें ऐकून बहुतेक माणसं जिवाच्या भितीनं पळून गेलीं. एक दोन इमानी माणसं होतीं, त्यांचा परवांच्या सार्थींत माझ्या बाबांच्या बरोबर निकाल लागला.

**उमाजी :** मग काय, सर्व वाड्यांत आज तुझ्याशिवाय कुणी नाहीं?

**पुतळ :** वाड्यांत आज एकटी पुतळ आहे, आणि तीसुद्धां वाड्यांत नसून आपल्यासमोर उभी आहे.

**उमाजी :** ठीक आहे! हरकत नाहीं. माझा आतांचा हुकूम तूं ऐकलाच आहेस. मुकाट्यानं सर्व किल्ल्या आमच्या स्वाधीन करण्याची तुझी इच्छा आहे का? बोल लवकर. तूं जर एकूणएक किल्ल्या आमच्या स्वाधीन करशील, तर तुझ्या केसालाही धक्का न लावतां पोटापुरतं तुला ठेवून बाकीचं आम्ही घेऊन जाऊं. पण न ऐकशील तर त्या सात मजली भव्य वाड्याची काय स्थिती होईल हें तुला माहीत आहेच. बोल लवकर.

**पुतळ :** नाईक, ही असाहाय्य बाला आपल्याला काय उत्तर देणार? माझ्या आवडत्या वाड्याची राखरांगोळी झालेली माझ्याच्यानं पाहवणार नाहीं. माझ्या वाड्यांतील सारसर्वस्वं आपल्याला अर्पण करायला मी तयार आहें.

**उमाजी :** ठीक आहे! इतक्या सामोपचारानं तूं वळलीस, आनंद झाला. हा उमाजी जन्माचा पाठीराखा केलास म्हणून समज. कळीकाळालाही आतां तुझ्याकडं वाकड्या नजरेनं पाहतां येणार नाहीं. चल, वाड्यांत चल.

**पुतळ :** नाईक, वाड्यांत जाऊन काय उपयोग ? वाड्यांतील गुप्त तळघर तुम्हांला पाहायचं असेल तर तें नकाशाशिवाय सांपडणार नाहीं. वाडा खणूनही त्याचा पत्ता लागणार नाहीं. माझ्या बाबांनीं मरतेवेळीं तळघराच्या किल्ल्या आणि तो नकाशाचा मौल्यवान् कागद माझ्या स्वाधीन केला आहे. नाईक, जीवापलीकडं जतन करून ठेवलेल्या त्या किल्ल्या नी तो कागद मी इथंच आणला आहे, पण बाबांच्या शेवटच्या आज्ञेप्रमाणें तो कागद एका व्यक्ती-शिवाय दुसऱ्या कोणालाही दाखवतां येणार नाहीं. क्षमा करा.

**उमाजी :** ठीक आहे ! इतकंच असेल तर इथलीं सर्व माणसं एकदम निघून जातील. ( तात्याबा व भिमाकडे वळून ) हें पहा, माझ्या माय, दादा, तुम्ही जरा बाजूला व्हा.

**तात्याबा :** नाईक, आपल्या दयेनं आज आम्ही जिवंत राहिलों. आम्हां गरीब नवराबायकोंची यापुढं चाकरी घ्यावी असा अर्ज आहे. धनी, आम्हांला आधार देण्याचं कबूल केल्याशिवाय...

**उमाजी :** ठीक आहे ! माझ्या झेंड्याखालीं येणाऱ्या कुणालाही मी आधार देत असतों. तुला कामगिरी पाहिजे ना, साहेबाच्या छावणींतली कांहींतरी बातमी काढून आण जा. पाहूं तुझी हुषारी !

**तात्याबा, भिमा :** जी ! ( मुजरा करून जातात. )

**उमाजी :** आन् हें बघ, गंग्या, तूं आपल्या लोकांना जमवून तुझ्या आईच्या मेण्याशीं उभे रहा. आलोंच मी.

**गंगाराम :** पण मामा, आईला दिव्याला पोंचवून तुम्हांला साहेबासनी भेटायचं आहे ना ? साहेब अक्शी घड्याळावानी वागतो म्हणून म्हणतों...

**उमाजी :** अरे साहेब घड्याळावानी वागतो...तर मी सूर्यावानी वागतों. जा, हा कागद मीं घेतला कीं आलोंच म्हणून समज. ( गंगाराम जातो. ) पुतळ, दाखव कागद, दाखव लौकर.

**पुतळ :** ( स्वगत ) काय झालं हें ! मी स्वप्नांत तर नाहीं ? माझी तनु अशी कंप कां पावूं लागली ? हा कागदही उचलण्याचं माझ्या अंगांत सामर्थ्य नाहीं. असं कां बरं व्हावं ? काय होतंय् मला ? माझं मलाच समजत नाहीं ! आम्ही दोघंच इथं आहोंत. यांच्याकडं पहाण्याचा मला धीर का

होत नाहीं ? कांहीं वेळ इथंच राहिलें तर माझ्या संपत्तीप्रमाणंच माझ्यावरही दरवडा घालायला हे कमी करणार नाहींत. नाहींत कशाला ! घातलाच आहे. पुतळवर स्वतःचा ताबा राहिलाय कुठं ! ज्या वीराला पाहाण्याची आजवर डोळ्यांना भूक लागली होती ती अशा रीतीनं...दरवडेखोर... खरोखर...दरवडेखोर आहेत हे !

**उमाजी :** (स्वगत) ही बया एकदम स्वस्थ कां झाली ? या दरवडे-खोराच्या हातावर तुरी देण्याचा तर हिचा विचार नाहीं ?

**पुतळ :** (स्वगत) माझ्या हातून हा कागद आपणहून ओढून घेतील का ?

**उमाजी :** पुतळ, तूं बोलत कां नाहींस ? त्या कागदाच्या रूपानं आपली सर्व धनदौलत माझ्या स्वाधीन करण्याचं कबूल केलं आहेस ना तूं ?

**पुतळ :** होय ! मी नाहीं कुठं म्हणतें ?

**उमाजी :** मग आतां उशीर कां ?

**पुतळ :** उशीर कां ? काय सांगूं ?

**उमाजी :** सांगायचं कांहींच कारण नाहीं. फक्त तो कागद माझ्या स्वाधीन कर आणि जाऊं दे मला.

**पुतळ :** आपण जाणार ?

**उमाजी :** म्हणजे ?

**पुतळ :** केवळ हा कागद आणि माझ्या वाडयांतील कवडीमोल संपत्ती लुटून आपण निघून जाणार !

**उमाजी :** कवडीमोल संपत्ती ! म्हणजे ! तुझ्या वाड्यांतील संपत्तीपेक्षां आणखी कुठं तुझी संपत्ती मला मिळणार आहे का, पुतळ ?

**पुतळ :** (स्वगत) काय सांगूं ? आन् कोणत्या शब्दानं सांगूं ? हृदयाचा कुलीनपणा माझ्या जिभेवर बसून तो तोंडून एक शब्दही बाहेर पडूं देत नाहीं.

**उमाजी :** पुतळ, तुझ्या या वागण्यानं... छेः !... मी काय समजूं ? पुतळ, तो कागद मला देण्यापासून तुला वाईट वाटतंय् का ? आपली सर्व संपत्ती लुटली जाणार, म्हणून तूं गोंधळून गेली आहेस का ?

**पुतळ :** किती वेडी शंका ! पुतळाच्या संपत्तीला आपल्याशिवाय निवाऱ्याची जागा साऱ्या जगांत तरी मिळेल का !

**उमाजी :** हें जर खरं, तर मग तुला वाईट वाटण्याचं कारण ?

**पुतळ :** माझ्या हृदयसंपत्तीला...या उघड्या पडलेल्या स्त्रीरत्नाला आपल्या तलवारीचा आश्रय न मिळतां आपण निघून जाणार म्हणून !

**उमाजी :** पुतळ, काय बोलतेस हें ? या तुझ्या बोलानं उमाजीला थक्क करून सोडलंस !

**पुतळ :** राग मानूं नका ! धीट म्हणूं नका ! आपल्या धनागारांत माझ्या संपत्तीला योग्य निवारा मिळणार तसाच आपल्या उदार हृदयाचा निवारा ह्या हृदयाला मिळण्याची मीं आशा केली तर ह्या अमर्यादेबद्दल पुतळचा आपण तिरस्कार नाहींना करणार ?

**उमाजी :** काय ऐकतों मी हें ! पुतळ, तुला वेडबीड तर नाहीं लागलं ?

**पुतळ :** पुतळच्या वेडाबद्दल आतां शंका कशाला ! चला, राजहंस, आपल्या धवलप्रभेनं ही पुतळ खरोखर वेडी झाली आहे. ज्यानं वेड लावलं त्यानंच तें वेड घालवलं पाहिजे. ज्यानं हृदयाला जखम केली त्यानंच औषध देऊन ती जखम बरी केली पाहिजे. धनी, लाज सोडून बोलतें पण लाज तरी आतां कुणाची धरूं ? आतां ह्या पुतळला जगाची पर्वाच राहिली नाहीं. राजे, आपल्याला लोक दरवडेखोर म्हणतात... माझी संपत्ती आपण लुटून नेणार आहांत...पण ती लुटण्याच्या आधीं माझी हृदयसंपत्ती आपल्याकडून केव्हांच लुटली गेली आहे.

**उमाजी :** ( स्वगत ) किती अनपेक्षित आणि गोड वक्त आलाय् हा ! ह्या मैनेच्या कंठांतून निघणाऱ्या बोलांनीं हृदयाला कसे झोले बसल्यासारखे वाटतात ! ( उघड ) पुतळ, तूं आपल्या बोलांनीं ह्या उमाजीला खरोखर आनंदून टाकलंस यांत शंका नाहीं. पुतळ, जगांत असा एकही पुरुष सांपडणार नाहीं कीं, ज्याला एखाद्या स्त्रीचं आपल्यावर प्रेम आहे हें ऐकून आनंदाचं भरतं येणार नाहीं. स्त्रीरत्नाइतकं मौल्यवान जगांत दुसरं कोणतं रत्न आहे ? पण प्रश्न आहे तो त्या प्रेमाचा !...त्या रत्नाचा स्वीकार करण्याचा !

**पुतळ :** कां बरं ? नरवीर, मी आपल्या प्रेमाला योग्य नाहीं का ? आपली दासी होण्याची माझी योग्यता नाहीं का ?

**उमाजी :** भलतंच ! या तेजस्वी हिरकणीला आपल्या तेजाबद्दल अशी शंका तरी कशी आली ?

**पुतळ :** आपल्यासारख्या नरवीराच्या हातावर झळकण्याचं तिच्या नशिबीं नाहीं म्हणून! नाईक, एखाद्या दुर्दैवी फुलाला देवाच्या मस्तकीं थारा मिळाला नाहीं, तर निदान त्याच्या पायाशीं आश्रय मिळावा असं त्याला वाटत असतं. धनी, दया करा; आणि या पुतळच्या प्रेमाचा अव्हेर करूं नका.

**उमाजी :** पुतळ, अशा प्रेमाचा अव्हेर करणं म्हणजे प्रत्यक्ष सौख्यसागराकडे पाठ वळवण्यासारखं आहे हें मी जाणतों. पण पुतळ, हा उमाजी सहज एखाद्या स्त्रीच्या प्रेमांत सांपडला असं कधींच घडणार नाहीं. अगणित सोनं आणि अनर्घ्य रत्नं लुटणं हा जरी माझा पेशा असला तरी तुझ्यासारख्या चालत्याबोलत्या सुवर्णखाणीची लूट हा उमाजी कधींच करीत नसतो. तुझ्यासारख्या स्त्रीरत्नाकडं वाकड्या नजरेनं तो केव्हांही पहात नसतो.

**पुतळ :** आणि म्हणूनच या पुतळच्या जीवाला आपली ओढ लागली आहे.

**उमाजी :** अग पण, माझ्यासारख्या बंडखोर दरवडेखोराच्या योग्यतेची तूं आहेस असं तुला वाटतं तरी कसं? कुणातरी भाग्यशाली सरदाराच्या नशिबीं असलेली ही लालडी जर मीं उचलून नेली, तर लोक मला काय म्हणतील?

**पुतळ :** धनी, आपण माझ्या सर्व संपत्तीचे मालक व्हायचं कबूल केलं आहे ना? मग, केवळ हाच बगीचा...धनी, या पुतळला आपल्याशिवाय आतां कुणाचाही आधार नाहीं. आणि हिला आधार देण्याची कुणाचीही योग्यता नाहीं. केवळ आपल्याच आश्रयानं ही नाजूक लता जिवंत राहील.

**उमाजी :** आणि मी तिचा अव्हेर केला तर?

**पुतळ :** तर कुणाच्या तरी पायदळीं पडून तिचं जीवित फोल होईल. धनी, पुतळच्या नशिबीं पायदळीं पडायचं असेल, तर आपल्या चरणीं मला पडूं द्या. म्हणजे जीवाचं सार्थक होईल. (गुडघे टेकते.)

**उमाजी :** (स्वगत) माझ्या मल्हारीनं किती गोड वक्त आणलाय् हा! या तेजस्वी स्त्रीच्या रूपानं माझ्या मल्हारीनं मला प्रसाद तर पाठविला नाहीं?

**पुतळ :** एखादी परस्त्री गळ्यांत पडते आहे...आपल्या हातून पाप होईल, असं का आपल्याला वाटतं? पण धनी, मी परस्त्री नाहीं. आणि आपल्या ब्रीदाला कलंक लागेल असं मी आपल्याला कांहीं सांगणारही नाहीं. प्रिय

कन्येबरोबर आपली संपत्ती एखाद्या उदार वीराच्या पदरांत टाकावी अशी माझ्या मृत पित्याची इच्छा होती, तेव्हां समुद्रासारख्या आपल्या विशाल हृदयांत......

**उमाजी :** ह्या उसळत्या सरितेला जागा मिळावी हीच ना तुझी इच्छा ?

**पुतळ :** ईश्वरी इच्छेनं प्राप्त झालेल्या पवित्र स्त्रीरत्नाचा त्याग करणं कसल्याहि जातीच्या पुरुषाला मुळींच शोभत नाहीं !

**उमाजी :** आणि ह्या जातिवंत दरवडेखोराला तर नाहींच नाहीं. पण पुतळ, मला तूं फसवीत नसशील कशावरून ?

**पुतळ :** धनी, मी आपल्याकरतां काय करूं ?

**उमाजी :** दुसरं कांहीं नाहीं. तुझ्या सर्व संपत्तींतील मुकुटमणी असा तुझ्या कंठांत असलेला कंठा माझ्या या मल्हारीच्या पेटीवर आत्तांच्या आतां बांध, म्हणजे माझी खात्री होईल.

**पुतळ :** एवढंच ना ? हा घ्यावा कंठा !

[ पुतळ उमाजीच्या दंडावर कंठा बांधते. उमाजी आपल्या कपाळावरील भंडारा पुतळच्या मस्तकीं लावून ' जय यळकोट मल्हार ' असा जयघोष करतो. ]

( पडदा )

---

## प्रवेश तिसरा

[ **स्थळ :** दिव्याच्या घाटानजीकच्या झाडींत कांहीं सशस्त्र शिपाई इकडून तिकडे फिरत आहेत. कांहीं वेळानें कॅप्टन मॅकिन्टॉश् लष्करी वेषांत प्रवेश करतो. सैनिक त्याला लष्करी पद्धतीचा सलाम करतात. ]

**कॅप्टन :** चलो, उस टेकडीके पीछे शब् लोक छुपकर बैठो, और मै शिटी बजातेही उसही जगेपर फैर करो. उ-मा-जी अबी यहां आयेगा, शायद ढोका होणेका मोका न गीर जाय. जाओ हुषारीसे रहो !

**सैनिक :** आपके हुक्मके माफिक सब् इन्तजाम करता हूं. लेकिन ओ सैतानसे आपकी मुलाखत होनेवाली है.

**कॅप्टन :** ओ मैं शबू जानता हूं. लेकिन ओ सैतान बडा शहाजोग है! जाव, तुम हुषारीसे रहो! (सैनिक जातो.) ऊ – मा – जी – ला आ–ज प्रत्यक्ष पाहाण्याचा वक्त आला ही खरोखर मोठ्या आनंडाची गोष्ट हाय. इटके दिवष ऊमाजीच्या मर्डायीच्या गोष्टी मी नुसत्या लांबूनच ऐकत होटो, पण आज तो वीर मला प्रत्यक्ष पाहयला मिळणार. ऊ-माजी जर खरोखरच डिलडार वीर पुरुष अशेल तर माझ्या भेटीचें चॅलेंज टो स्वीकारल्याशिवाय राहणार नाय. एवढा मोठा वीर पुरुष बंडखोर बणून वाया जावा–आपशोश है! ऊ-माजीच्या ह्या विचित्र आयुष्याचें कोडें उलगडण्याचा प्रयट्ण करून त्याला ह्या दरोडेखोरीपाशून मागे फिरविण्याचा मी आज निकडीचा प्रयट्ण करणार. टो जर मला वळला तर ठीकच. नाहींटर कंपनी सरकारच्या हुकुमाप्रमाणें ट्याला या जगांतून नाहींसा करावा लागणारच. आजवर टो सांपडला नाय म्हणूणच वांचला हाय. नाहींटर ह्यापूर्वी केव्हांच टो फांशीवर ठांगलाबी गेला असठा. (बंडुकीचा बार होतो.) खुणेचा बार टर झालाच, ह्यावरून ऊ-माजी भेटीला येत आहिसा दिसटो. (पाहून) शाबास, ऊ – माजी, रिअली यू आर ए करेजस मॅन्. बायबलची कषम खाऊन भेटीला बोलवटाच निर्भयपणें भेटीला आलाष, खरा मर्ड आहेष. (उमाजी प्रवेश करतो.) खोण ? खोण तूं ?

**उमाजी :** जंगलचा राजा! करवंदीच्या जाळींत घोरत पडणारा शेर!...... साहेब, उमाजी नाईक म्हणतात मला.

**कॅप्टन :** खोण ? ऊ – माजी...... व्हेरी ग्लॅड टु सी यू. शेक हॅंडस्... हा – टांट हाट दे दोस्ट.

**उमाजी :** रामराम साहेब! सलाम! एक कुस्तीच्या आणि दोस्तीच्याच वेळीं हातांत हात देण्याचा आम्हा मराठ्यांचा रिवाज आहे. मी आपल्याशीं दोस्ती करायला आलों नाहीं, त्याचप्रमाणं कुस्तीही करायला आलों नाहीं. शत्रूला ओळखून लांबूनच रामराम करण्याचा आमचा मराठी शिरस्ता असून, शत्रूंचाही हातांत हात घेऊन मनसोक्त हंसण्याचा तुम्हां लोकांचा शिष्टाचार आहे. पण साहेब, मनांत असतं तेंच कृतींत दिसावं हें बरं नाहीं का ? ह्या उमाजीच्या पाक मनाचा लांबूनच रामराम घ्या साहेब, राग मानूं नका. ह्या उमाजीला गोळीच्या टापूंत आणायला टपलेले, ह्या उमाजीचं स्वातंत्र्य नाहींसं करण्याकरितां आलेले, कंपनीसरकारनं मुद्दाम माझ्या वधाकरतां नेमलेले शूर सेनापतीसाहेब ते आपणच का ?

**कॅप्टन :** होय ! शापडशील त्या क्षणीं ठार खरण्याचा कंपनीसरकारचा हुकूम घेऊण तुझ्या बंडाच्या कामगिरीवर आलेला कॅप्टन मॅकिन्टॉश टो मीच.

**उमाजी :** आणि म्हणूनच आपल्या हातांत मला हात देतां येत नाहीं. साहेब, आपल्या शब्दांवर विश्वास ठेवून मी आपल्या भेटीला आलों आहें. आपल्याला अगदीं थोडा वेळ असेल, काय बोलायचें असेल तें चार शब्दांत बोलून आपण आपले मार्ग धरूं या.

**कॅप्टन :** पण, ऊ–माजी मी टूझी मैत्री चाहटो. ही बंडखोरी, णावाला काळीमा आणणारी ही डाकूगिरी षोड्रन एखाडी शरकारी नौकरी मिळवूण षण्मार्गाला लाग. बंडखोर आणि डरवडेखोर हे किताब लावून घेण्याट काय भूषण हाय !

**उमाजी :** साहेब, बंडखोर आणि दरवडेखोर हे माझ्या नांवामागले किताब ह्या जन्मीं तरी निघणं शक्य नाहीं. साहेब, हा उमाजी जर स्वराज्य-काळीं जन्माला आला असता तर तो आपल्या मायभूमीसाठीं रक्ताचा सडा घालणारा स्वतंत्र सेनेचा शूर सेनानी म्हणूनच चमकला असता आणि त्याच्या नांवामागं बंडखोर हा काळा किताब लावण्याची कुणाचीही छाती झाली नसती. पण दुर्दैवाची गोष्ट आहे साहेब ! आज माझ्या मायभूमीचा सौभाग्यतिलक पुसला गेला असून तिचा वैभवशाली भाग्यध्वज खालीं आला आहे. साहेब, पारतंत्र्यांत बंडखोर म्हणवून घेण्यांत ह्या उमाजीला मुळींच वाईट वाटत नाहीं. माफ करा.

**कॅप्टन :** पण, अषा वागण्यानें टू काय मिळवणार ?

**उमाजी :** आणि माझ्याकडून चाकरी करून घेऊन सरकार तरी मला काय देणार ?

**कॅप्टन :** लष्करांटील माण आणि मणाची स्वछठा.

**उमाजी :** त्या गोष्टींची ह्या स्वतंत्र उमाजीनं कधींच आशा केलेली नाहीं. तुमच्या नोकरींत मला भरपूर आणि मनाजोगं काम मिळायचं नाहीं साहेब ! साहेब, गंज चढून समशेरीला लाली आलेली पाहण्यापेक्षां दुष्मनाच्या रक्तानं ती लाल झालेली पाहाण्यांतच ह्या उमाजीला अधिक आनंद वाटतो. साहेब, माफ करा. तुमचा दिलदारपणा हा उमाजी ओळखून नाहीं असं समजूं नका. (कॅप्टन "थँक्स" म्हणतो.) पण काय सांगूं

साहेब, उमाजी पारतंत्र्यांत जन्माला आला म्हणूनच तो बंडखोर बनला. रणधुमाळीची पूर्वजन्मींची अतृप्त राहिलेली इच्छा पूर्ण व्हावी म्हणूनच तो बंडखोर बनला, आणि म्हणूनच तो जन्माला आला. माशा मारीत स्वस्थ बसण्याकरितां निर्जीव अप्रिय नोकरी करून मेलेलं आयुष्य कंठण्याकरितां हा उमाजी जन्माला आला नाहीं साहेब!

**कॅप्टन :** लूठालूठ करणं, डरवडे घालणं म्हणजे जिवंट राहणं णव्हे.

**उमाजी :** साहेब, ऐन्याशिवाय स्वतःचं तोंड स्वतःला कसं दिसणार? दरोबस्त जगांत दरवडेखोरीच या उमाजीला दिसते आहे. साहेब, नीतिन्यायानं पैसा मिळवणारे लोक ह्या जगांत फारच थोडे निघतील. ह्या उमाजीला चोहोंकडे दरवडेखोरच दिसताहेत. दरवडा घालण्याच्या पद्धतींत फरक असेल इतकंच. साहेब, माझ्यासारखे उघडे दरोडेखोर ह्या जगांत फारच थोडे असून दुसऱ्याचं कल्याण करण्याची गुळचट भाषा वापरणारे पण त्याच क्षणीं त्याचा केसानं गळा कापणारे गळेकापूच ह्या जगांत फार आहेत...साहेब, तसं जर नसतं तर हें जग शांतीचं नंदनवन बनलं असतं. दरिद्री आणि दुःखी लोकांची वस्ती पाहूं गेल्या सांपडली नसती. हे माझे अडाण्याचे विचार आहेत साहेब! (कॅप्टन "नो नो" म्हणतो.) नाहीं कसं, मी तुमच्यासारखा शिकलेला नाहीं, तरीपण माझ्या व्यवहारी अनुभवाचा आपण उदारपणानं विचार केला तर माझं म्हणणं तुम्हांला पटल्याशिवाय राहणार नाहीं.

**कॅप्टन :** दॅट् इज टू से, तूं आपला मार्ग षोडणार णाईस तर?

**उमाजी :** एकदां मार्ग धरला तो धरला. एक मार्गाची अखेर, नाहींतर प्राणाची अखेर!

**कॅप्टन :** दुर्दैवी प्राण्या, टर मग टुझ्या प्राणांची अखेर लवकरच होईल, माइन्ड वेल!

**उमाजी :** ती मानानं करून घेण्याकरतां हा उमाजी जीवापाड झटेल.

**कॅप्टन :** प्रबल सरकारच्या हाटून टू वांचशील अशे शमजूं नखोश! ऊ–माजी, आपल्याच हाटानें टू श्वताची कबर बांधतो आहेस!

**उमाजी :** कबूल! पण ती कबर लोकांच्या नजरेंत कायमची ठसावी अशी मी तिच्यावर वेलपत्तीबी काढितों आहे साहेब! (कॅप्टन आनंदानें मान डोलावतो.)

**कॅप्टन :** ठीक हाय ! आतां टू कसा जिवंत राहटोस टेंच मी पाहतों.

**उमाजी :** अमर कोण आहे साहेब? बिजली आपल्या इच्छेनें चमकली तरी तिला फार वेळ राहतां येत नाहीं. लोकांना क्षणभर आनंद देणं हेंच तिचं काम.

**कॅप्टन :** ( आनंदानें ) आय् एम् व्हेरी लकी टू फेस सच् ए जनरस् फो. शट्रुनीं एकमेखांना उघड मणानें भेटण्याचा आसा प्रशंग पुन्हां कधींबी येणार नाय. ह्या वीराची मौजेखाटर आणकी ठोडी परिक्षा पाहू ! ( कॅप्टन शिटी वाजवतो व आंतून उजवीकडून बंदुकीचे बार होतात. ) ऐक उमाजी, ही बंडूकीछी फैर ऐक. आमच्या फाशांटून टू कधींच शूटणं शख्य नाहीं ! शमजलाश ! हा आठाच पहा ! टू आमच्या हाटांट पूरेपूर शापडला हायेश. शपठेवर फशून टू माझ्या भेटीला आलाश आणि आमछ्या पंजांत शापडलाश. बोल ! ह्याचवेळीं मी टूला डगा केला आहे असें शमज. डूशरी शीट होटाच त्या पलीकडल्या ठेकडीमागून शंभर सोल्जर्स ढांवून येटील आणि टूझ्या शरीराछ्या चिंधड्या उडवटील. बोल ! आठाच टूला ठार केला टर !

**उमाजी :** तसं नाहीं व्हायचं साहेब ! देवाच्या शपथेनं तुम्हीं मला भेटीला बोलावलं आहे. शिवाय तुम्ही शूर पुरुष आहांत असं मीं ऐकलं आहे. खरा वीर शत्रूला उघड उघड सामना देतो, दगा कधींच करीत नाहीं. त्यांतून तुमच्या मनांत कांहीं पाप आलंच, तर तुम्हांला द्यायला नजराणा मीं अगदींच आणला नाहीं असं समजूं नका ! त्या पलीकडच्या झाडींत माझे दीडशें कडवे रामोशी माझ्या इशाऱ्याची वाट पहात आहेत. ( उमाजी "जय यळकोट मल्हार" म्हणून ओरडतांच आंतून अनेक वाद्यांचे आवाज व "जय यळकोट मल्हार, जय यळकोट मल्हार" म्हणून उमाजीच्या लोकांचा जयघोष ऐकूं येतो. थोड्याच वेळांत उमाजीच्या खुणेनें जयघोष व वाद्यांचा आवाज बंद होतो. ) ऐकलंत साहेब ! एकमेकांच्या मनांत पाप यायला नको. आपलं बोलणं संपलं असल्यास आपण दोघेही आपआपल्या सैन्यांत जाऊन मिळूं या !

**कॅप्टन :** शाबास रे वीरा ! ऊ–माजी खरा जनरल आहेश टूं ! जा खुशाल आपल्या लोखांत ज्यावून मिसळ. ऊ–माजी टूला आशा थरेनें ढोका देण्याछी माझी ईश्वर शाक्ष विच्छा नव्हती आणि णाहीछी. टू माझ्या हाटांट

हाट डेण्याचें नाखारलेंस म्हणूण आफल्या प्रटीस्पढर्याची टाकट युक्टीनें ओळखण्याछा हा माझा डाव होटा. जा, पण शांगून ठेवटो, यापुढें माझ्यापाशून टूं आपला बछाव कर.

**उमाजी :** ठीक! आपला आखाडा ठरलाच तर मग! घ्या तर मग आतां साहेब, या उमाजीची कुस्तीची सलामी! जय यळकोट मल्हार!

[ दोघेही हातांत हात घेऊन एकमेकांस सलाम करतात. ]

( पडदा पडतो. )

## अंक पहिला समाप्त

# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

[**स्थळ :** दिव्याच्या घाटांतील झाडींत असलेली कॅप्टन मॅकिन्टॉशची छावणी. तात्याबा व काळोजी प्रवेश करतात. तात्याबा चपराशाच्या वेषांत असून, काळोजीच्या अंगांत बाराबंदी, डोक्यास साधी बत्ती, पायांत गुढघ्यापर्यंत सुरवार व अंगावर कांबळें आहे. ]

**तात्याबा :** हं, तुमचं नांव काय – काळूजी काय – अन् तुम्हांस्नी साहेबाला भेटायचं हाय म्हंता ?

**काळोजी :** व्हय.

**तात्याबा :** ठीक हाय ! त्या पल्याडल्या पिपळाच्या पारावर बसा. मी तुमच्याबद्दल साहेबाला हिजीट विचारून येतो. (स्वगत) काळोजीच हा. ह्याला कुत्र्यावाणी हांकलला पाहिजे नाकाड ठेंचून. बस म्हणावं कांहीं वेळ असाच जांभया देत. (जातो.)

**काळोजी :** तात्याबाच हा. पट्टेवाल्याच्या ऐटींत या बाबानं मला ओळखलं नाहींसं दिसतं. ठीक आहे ! आपण तरी त्याला उगीच कशाला ओळख द्या. कसंतरी आपलं काम करून घेतलं कीं मिळवली. त्या उद्दाम उमाजीनं बेफामपणानं माझीं बोटं चेंचलीं; पण आतां त्याची मान चेंचल्याशिवाय हा काळ्या रहात नाहीं. उमाजी, हा काळोजी तुला आतां काळासारखा घशांत टाकल्याशिवाय स्वस्थ बसणार नाहीं हें तूं पुरेपूर ध्यानांत ठेव. कृतांत काळ ह्या काळोजीच्या रूपानं तुला केव्हां नाहींसा करील ह्याची तुला कल्पनाही होणार नाहीं. पुतळाच्या वाडयांतील अफाट संपत्ती हातीं आली म्हणून तूं दिमाखांत असशील, नुकतंच लगीन लागलेल्या पुतळाची नवी नवती लुटण्यांत तूं दंग असशील, इंद्रभुवनासारख्या तिच्या वाड्यांतील ऐषआराम भोगण्यांत तुला स्वर्गसुखसुद्धां तुच्छ वाटत असेल, पण थोड्याच दिवसांत तुझ्या सर्व दिमाखाची आणि सुखाची राखरांगोळी होईल हें माझं भाकीत लक्षांत ठेव.

या काळोजीला तूं दुखवलं नाहींस, तर एका काळसर्पाला डिंवचून उलट दंश करण्याची त्याला तूं मोकळीक दिली आहेस. तुझ्या हाताखालच्या नायकाला तूं लाथ मारली नाहींस, तर एका महापराक्रमी क्रूर वाघाच्या मस्तकावर तूं लाथ मारली आहेस. तुला जर कांहीं अक्कल असेल, तुझ्यांत जर कांहीं पराक्रम असेल, तर या टिपण साधून येणाऱ्या कालियाच्या दंशापासून, किंवा चवताळून झेंप घालणाऱ्या या वाघापासून आपला बचाव कर. (जरा वेळ तात्याबाच्या वाटेकडे पाहून) पण हा तात्याबा केव्हां येतोय ? (पुन्हां पाहून) ओ शिपाईदादा, हो —

**तात्याबा :** (रागावून प्रवेश करून) कां ? खिंकाळतोयास असा घोड्यावाणी ? साहेबाच्या छावणीमंदी उभा हाईस, समजत न्हाई तुला ? तूं हथें होळीचं टेक समजतो हाईस का काय ?

**काळोजी :** नाहीं शिपाईदादा.

**तात्याबा :** मंग असा कोकलतोयास त्यो ?

**काळोजी :** नाहीं शिपाईदादा, माझं अगदीं तांतडीचं काम हाय बघा.

**तात्याबा :** व्हय ? पन इकतं हाय काय काम साहेबाम्होरं ? काय चोरीचं, खुनाचं नायतर लांडीलबाडीचं काम तर नाय ना ? ह्ये बघ, असलं सटरफटर कचरावजा काम असंल तर आमच्या साहेबाला भेटाया बिलकुल टेम नाय. चले जाव – गो ऑन – राव. आमचा साब कोणाच्या कामगिरीवर आला हाय ह्योची खबर नाय राव तुम्हांला. उमाजीला पकडण्यापायीं इलायतेहून आमच्या साहेबाची सवारी आली हाय. लय मोठ्ठा – लय मोठ्ठा – लय मोठ्ठा साहेब हाय, राव !

**काळोजी :** कबूल आहे; आणि म्हणूनच त्यासनी मला भेटायचं हाय.

**तात्याबा :** असंल. म्हणून काय एकदम तुम्हांस्नी त्येची हिजिट मिळनार नाय. तुझ्यासारख्या ओंगळ अन् रानवट मानसाला भेटनारा आमचा साहेब नाय. त्येच्या म्होरं बूट इस्टाकण्या घातलेला साहेबावानी झकपक पोषाख केलेला मनुष्य यावा लागतो. राव, तुम्ही जर त्येच्या म्होरं असा गांवरानी पोषाख करून गेला तर त्यो तुम्हांस्नी आपल्या बुटाचीबी किंमत देनार नाय.

**काळोजी :** शिपायदादा, ह्यें तुम्ही मला सांगाया नग. म्यां लै साब पघितल्याती !

**तात्याबा :** बेवकूब नॉन्सिट मनुष्य! पुष्कळ साब बघितले म्हणतोस? आमच्या बरकंदाज साहेबाच्या पायपोसाचीबी तुला किंमत येनार नाय. अन् साहेबाचा इन्सिट करतोस? चले जाव यहांसे!

**काळोजी :** नोकरी करावी तर अशी करावी. किती कसोशीनं साहेबाच्या मानाची जपणूक करतायसा तुम्ही, नाईकसाब!

**तात्याबा :** करतों म्हंजे करतोंच हाय. जन्म देणारा आमचा छोटा बाप अन् साहेब आमचा बडा बाप असतोया.

**काळोजी :** कबूल आहे. पण मेरा बाप, मस्नी भेट घेऊं दे ना तुझ्या साहेबाची!

**तात्याबा :** नो नो राव! तुम्ही साहेबाला भेटायचं म्हनतां, पन आम्हांस्नी त्यापार्यी किती तरास पडतोया ह्याची तुम्हांस्नी कल्पना नाहीं राव. येस फ्येस करीत जवां का अंगावर येतो तवां काय घाबरगुंडी उडतीया! म्हनून म्हंतों, उगीच कशापार्यी तरास घ्या! चले जाव – गो ऑन!

(बेपर्वाईनें इकडे तिकडे फिरत राहातो.)

**काळोजी :** हें बघा नाईकसाब, मी तुम्हांस्नी तरास देत नाहीं. पन् माझं हें पोट तरास देतंया. साहेब लशकराची भरती करीत असल्याचं समजलं म्हणून मी लांबून आलों बघा! त्यापार्यी मस्नी लई हिंडावं लागलं. साहेब भोराकडं मांढरदेवाच्या डोंगरांत छावणी टाकून आहे असं कळलं म्हणून मी आधीं तकडं गेलों. मंग कात्रजच्या घाटांत तपास केला. अन् आतां या दिव्याच्या घाटांतल्या छावणींत आलों. साहेबाची गांठ घेण्यापार्यी मस्नी लई पायपीट करावी लागली बघा!

**तात्याबा :** ह्यें बघा, नोकरीपार्यी अशी पायपीट करावी लागनारच. मला नाय तसा तरास पडला? – अन् पडनारच!

**काळोजी :** तुम्हांस्नीसुद्धां त्यो अनुभव हायेच ना? हां – म्हणूनच म्हणतों, आली तर तुम्हांस्नीच माझी दया येईल. कसंही करा अन् साहेबाची भेट करून द्याच राव!

**तात्याबा :** नाई रं बा – आज काय तुझी अन् साहेबाची भेट व्हायची नाय. साहेब उमाजीला धुंडण्यापार्यी डोंगराला गेलाया. उगीच नग माझ्या डोक्याला तरास देऊं. चले जाव!

**काळोजी :** ( स्वगत ) आतां ह्याला निराळ्याच तऱ्हेनं वळवायला पाहिजे. ( उघड ) हें बघा शिपाईदादा, मघापून मी इचार करतुया ; तुम्हांस्नी कुठं तरी पाहिल्यावानी वाटतंया !

**तात्याबा :** ( स्वगत ) वळखलं – ह्या काळ्यानं वळखलं ! ( उघड ) ह्यं बघा राव, मीबी मघापून त्योच इचार करतुया. तुम्हांस्नी मीबी कुठं तरी पाहिल्यावानी वाटतंया.

**काळोजी :** तुम्ही कुठं डोंबवाडीला –

**तात्याबा :** हां जी हां ! घंटा वाजवीत, ढोल पिटीत अन् " जय यळकोट मल्हार " करीत आलेलं तुम्ही काळोजीराव.

**काळोजी :** बराबर वळखलंत. अन् त्या घरांतलं तुम्ही –

**तात्याबा :** ( हातावर हात मारून ) तात्याबा.

**दोघेही :** राम राम. राम राम.

**काळोजी :** ( स्वगत ) अरे चोरा !

**तात्याबा :** ( स्वगत ) अरे हरामखोरा ! ( उघड वरवर हंसून ) बरं झालं, आपली भेट झाली. हें बघा, पूर्वीचं आपन समदं इसरूशान जाऊं. मी खटपट करूनशान पोटाला अर्धी भाकरी मिळवलीया. तुम्हीबी पोटाला तुकडा मिळविन्याच्या खटपटींमंदी आहां. तुम्ही पूर्वीचं कायबी मनांत ठेवूं नका, अन् मीबी ठेवीत नाय.

**काळोजी :** भले शाबास ! तुम्ही खरोखर देवमाणूस आहां, अन् मीहि आतां जरा सचोटीनं वागून पोटाला भाकर मिळविणार आहे. नको त्या स्वाऱ्याशिकारी अन् ती उमाजीची कदर !

**तात्याबा :** फार छान ! आपल्याला पसंत पडला तुमचा इचार. त्या उमाजीवानी काळाशीं खेळ खेळून आपणा गरिबांचा कसा निभाव लागणार ? राव, त्येच्यावर हाय गजांत लक्षीमीचा वरदहस्त. रोज रोज नवी नवी संपत्ती येऊन मिळतीया. अव राव, परवांचंच बघा, ती आमच्या वाडींतली पुतळ पोर —

**काळोजी :** तिचं काय झालं ?

**तात्याबा :** ती त्येच्या दृष्टीस पडली काय, त्येंचीं मनं जुळलीं काय, लगेच त्येंचं लगीन लागलं काय, अन् तिची अलोट संपत्ती त्येला मिळाली काय! समदंच इचित्र!

**काळोजी :** इची भन, आमांस्नी कायबी माहीत नाहीं!

**तात्याबा :** कांहीं म्हणा काळोजीराव, नाईकाला जेजुरीचा मल्हारी परसन्न आहे खास!

**काळोजी :** अहो, त्याशिवाय का कुणाला इतकं वैभव मिळत असतं? पण हें बघा, उमाजीचीही मल्हारीवर तशीच निष्ठा आहे हं तात्याबा!

**तात्याबा :** हो हो तर. अव राव, पुतळच्या जवाहिरांत सांपडलेला एक बडा कंठा त्यानं स्वतःकरतां न ठेवतां एकदम खंडोबारायाला वाहून टाकला. मल्हारीचा भगत म्हणून घेऊनशान पोत्यावारी बेलभंडार उडविणारे लई असत्यात; पन येवढा मोठा दहाइस हजाराचा कंठा आपल्या देवाला वाहून टाकणाऱ्याची सरद्धा अन् छाती दगडाची असली पाहिजे. शेंकडा रुपया दरानं देवाशीं भक्तीचा व्यापार करणारंच लोक फार!

**काळोजी :** अगदीं बराबर. पण काय हो तात्याबा, येवढा मोठा कंठा उमाजीनं खंडोबाला वाह्यला हें मात्र नवल आहे बुवा!

**तात्याबा :** वाह्यला म्हंजी – अजून जेजुरीला नाहीं गेला. तुरुत त्येनं आपल्या दंडांतल्या मल्हारीच्या पेटीवर त्यो बांधून ठेवला हाये. आज ना उद्यां सोजरांचा तान कमी झाला म्हंजी जाईल कडेपठाराला अन् वाहील कंठा.

**काळोजी :** बरं, तें राहूं द्या. मग आमच्या कामाचं लष्करांत जमलं तर बघा ना राव!

**तात्याबा :** राव, तुम्ही आतां कशापायीं काळजी करताया? तुमचं काम आतां आमच्याकडं लागलं. हें बघा, तुम्ही येत्या बेस्तरवारीं या, म्हंजी बराबर तुमची अन् साहेबाची गांठ घालून देतों.

**काळोजी :** बरं, जा तुम्ही आपल्या कामावर; मी जातों आपल्या वाडीला.

**तात्याबा :** अच्छा! आता गेलंच पाहिजे मला. हाफीसचं काम लई पडलंया. (जातां जातां स्वगत) या जन्मीं तुझी अन् साहेबाची गांठ पडूं न देईन तरच नांवाचा तात्या. (जातो.)

**काळोजी :** ज्या कारणाकरितां रात्रंदिवस ऊनतहान न पहातां मी सारखा घुमतों आहें, तें काम इतक्या सहज रीतीनं सफल होईल ह्याची मला कल्पनासुद्धां नव्हती. या काळोजीनं ताकाच्या पाण्याकरितां नरटी पुढं केली अन् अचानक मलईच्या दह्याचं गाडगं त्याच्या हातीं आलं. मल्हारीमार्तंडाला उमाजीनं कंठा अर्पण केला असून तो त्याच्या दंडांत आहे काय ! ठीक आहे. साहेबाची भेट झाली कीं, उमाजीची मान अडकविण्याचा अर्धा फांसा तयार झालाच. आतां जिजाकडं—पण आतांच नको ! याच वेळीं जरा ओढ लावली पाहिजे. एक दोन दिवसांत जिजाकड जावं आणि मग बघावा त्या उद्दाम उमाजीचा इंगा !

---

## प्रवेश दुसरा

[ **स्थळ :** दिव्यांतील जिजाचें घर. जिजा प्रवेश करते. ]

**जिजा :** ( प्रवेश होतांच बाहेरील दाराकडे शांतपणें पाहून ) काळोजींना निरोप पाठवून आज किती तरी दिवस झाले, पण चिठ्ठी नाहीं कीं चिटपाखरूंहीं इकडं फिरकलं नाहीं. आतां रखमा तरी काय निरोप आणते कुणास ठाऊक ? उमाजीदादानं त्यांना शासन करून नोकरीवरून दूर केल्याचं समजल्यापासून या जिजाला कांहीं सुचत नाहीं कीं, अन्नही गोड लागत नाहीं. कसं भांबावल्यासारखं झालं आहे ! दैवाची खैर, नाहींतर त्यादिवशींच काळूजींचा निकाल लागला असता ! मी होतें म्हणूनच काळूजी वांचले, नाहींतर बोटाऐवजीं काळूजींची मानच... पण नको, ती कल्पनाच नको ! प्राणांतींही दादाच्या विरुद्ध न जाणारी मी, त्याला मल्हारीची शपथ घालून आड आलें म्हणून बरं झालं; नाहींतर डोळ्यांदेखत या जिजाच्या नशिबीं काय पहायचं आलं असतं आणि त्यामुळं या जिजाची काय अवस्था झाली असती देवाला माहीत ! पण माझ्याकडं नेहमीं दुर्लक्ष करणाऱ्या काळूजीबद्दल मी तरी इतका विचार कां करावा ? खरंच, मी कां बरं दादाच्या आड आलें ? आजवर दादानं कितीतरी लोकांना भाल्याच्या टोकावर टांगलं नाहीं का ? मग त्यांची जशी या जिजाईला पर्वा वाटली नाहीं तशीच काळोजीबद्दल—पण नाहीं ! ही कल्पनाच माझ्या हृदयाला अनंत यातना देते आहे. माहेरी आंबेवनांत उमाजी, मी आणि काळोजी स्वैर फिरत होतों ; तो काळ उलटून गेल्याला आज किती-

तरी वर्सं झालीं. ही जिजा त्यावेळीं बारा पंधरा वर्सांची होती. आज ती दुप्पट उमरीची झाली आहे. हो, झाली आहे – पण जगाच्या दृष्टीनं. पण मन छेः! मनाला आवर घालतांच यायचा नाहीं आणि त्याच्या शक्तीला परिमितीही नाहीं. काळूजीबद्दलच्या ओढीला दुसरं काय कारण? बालपणचीं तीं रम्य चित्रं इतक्या दिवसांनीं जरा तरी दृष्टीआड व्हायचीं होतीं! – पण छेः! नाहींच आवर बसायचा. दादानं काळूजींना भाल्यावर टांगलं नसतं, तर ह्या जिजाच्या काळजाला टांगलं असतं. कोण रखमा? माझ्या हृदयाच्या खोल संदुकेंत आस्थेनं जपून ठेवलेल्या मोतीमोलाच्या इच्छेला पुन्हां शब्द फुटायला ही सोन्याचीच संधी आली म्हणायची! ये, ये रखमा. बाई, आलीस वाडीहून? (रखमा प्रवेश करते. तिनें पायापासून डोक्यापर्यंत पांढरी भुती वेढलेली असते. प्रवेश करतांच ती आपले अवगुंठन दूर करते.) ये अशी. हं, काय झालं? गांठ पडली?

**रखमा :** हो पडली, पण –

**जिजा :** पण काय रखमा?

**रखमा :** गांठ पडून न पडून सारखंच झालं.

**जिजा :** तें कां?

**रखमा :** काळूजी फारच घाईत होते.

**जिजा :** कसल्या घाईत होते?

**रखमा :** तें काय मला माहीत?

**जिजा :** म्हणजे! त्यांनीं तुला कांहीं सांगितलं नाहीं?

**रखमा :** नाहीं.

**जिजा :** पण इकडं येण्याबद्दल –

**रखमा :** केव्हांतरी येऊन जाईन म्हणून निरोप सांगितला आहे इतकंच.

**जिजा :** इतकी निराशा होईल असं वाटलं नव्हतं मला! अखेर हाच निरोप आणलास, रखमा?

**रखमा :** बाई, इतकं निराश होण्याचं काय कारण? माणूस जरा गडबडींत असलं म्हणजे दोन दिवस लागायचेच. नाहींतरी तुमचा भारीच हळुवार स्वभाव जिजाबाई!

**जिजा :** हो, आहे खरा तसा माझा स्वभाव.

**रखमा :** पण मी म्हणतें, आतां तुम्ही काळूजींच्याकडं जरा दुर्लक्ष नको का करायला? नाईकांनीं त्यांना आपल्या सैन्यांतून काढून टाकलं; तेव्हां तुम्हीही –

**जिजा :** मीही त्यांना आपल्या आठवणींतून काढून टाकूं?

**रखमा :** नको का टाकायला? तुम्हांला तुमचा दादा जवळ का काळूजी जवळ?

**जिजा :** काय सांगूं रखमा? उमाजीदादा माझा भाऊच असल्यानं, बांधवाबद्दल मला जवळीक वाटावी हें सरळच आहे. पण काळूजीबद्दलही मला तितकाच जिव्हाळा वाटतो, समजलीस. तुला अचंबा वाटेल, पण मी तरी काय करूं? जिव्हाळा वाटतो खरा!

**रखमा :** कां बरं इतका जिव्हाळा वाटतो? विचारूं नये माझ्यासारख्या नोकरमाणसानं, पण विचारतें.

**जिजा :** विचार, माझ्याचकरतां विचार. गत सुखाचे क्षण म्हणजे चालू काळच्या घटकाच नव्हेत तर काय! नुसत्या आठवणीनं वेळ निघून जातो. मग बोलण्यांत जाईल त्यांत नवल काय?

**रखमा :** काळोजी तुमच्या माहेरचे –

**जिजा :** माहेरचीं पुष्कळ माणसं असतात.

**रखमा :** मग आणखी काय? – तुमच्या वाड्याजवळचे

**जिजा :** वाडयाजवळ त्यावेळीं पुष्कळ मुलं होतीं.

**रखमा :** मग काय नात्यांतले?

**जिजा :** नात्यांतले नव्हते, पण होणार होते.

**रखमा :** म्हणजे?

**जिजा :** अगदीं बाळपणापासून वाढत वाढत बळकट झालेल्या प्रेमरज्जूनं आम्ही एक होणार होतों रखमा!

**रखमा :** मग इथं पडण्याचं कारण?

**जिजा :** दुर्दैव!

**रखमा :** कां बरं ? दादाजीनाईकांना – तुमच्या वडलांना काळूजी पसंत नव्हते ?

**जिजा :** कसे पसंत असणार ? या घरापुढं काळूजी म्हणजे त्यांच्या दृष्टीनं कांहींच नव्हते !

**रखमा :** म्हणून काय झालं ? तुम्ही जर दादाजींना सांगितलं असतं तर –

**जिजा :** नांव कशाला ! अग दादाजींच्यापुढं उमाजीदादाचीसुद्धां उभं राहण्याची छाती नव्हती तिथं माझा काय पाड ?

**रखमा :** एकूण तुम्हीहून काळोजींना मनानं वरलं होतं म्हणायचं ?

**जिजा :** मी एकटीनंच नाहीं तर आम्ही दोघांनींही एकमेकांना मनानं जिंकलं होतं.

**रखमा :** अरे देवा !

**जिजा :** नुसतं जिंकलं होतं इतकंच नव्हे, तर आम्हीं आमच्या आंबेवनांतल्या खंडोबापुढं तशा शपथा –

**रखमा :** झालं तें झालं, पण जिजाबाई आतां तुम्ही तें सर्व विसरून जायला हवं. कांहीं असलं तरी तें आतां देवाघरीं –

**जिजा :** देवाघरीं ? – पण जाऊं दे. तुला आपली सहज हकीकत सांगितली झालं तूं विचारलीस म्हणून. जा तूं. अजून काम आटपायचंय. जा तूं.

**रखमा :** ( स्वगत ) भारीच चमत्कारिक अन् हट्टी स्वभाव !

**जिजा :** जा तूं रखमा आपल्या कामाला ! ( रखमा जाते. ती गेल्यावर कांहीं वेळानें ) देवाघरीं ! देवाघरीं पाप होईल असंच म्हणणार होतीस. अगदीं शंभर वर्सांचं देवानं आयुष्य दिलं तरीसुद्धां – अगदीं शंभराव्या वर्षीं-सुद्धां आठवण विसरायची नाहीं. देवाघरीं ! आठवण कुणीं दिली ? मन कुणीं दिलं ? भावना कुणीं दिल्या ? देवानंच ना ? या जिजाचं लग्नच मुळीं झालं नाहीं. पण काळूजी माझ्याशीं नीट – मला ते टाळतात. दादाशिवाय या जिजाला जगांत दुसरं कुणीच नाहीं. दादाचं लगीन लागून तो सुखी झाला; अन् मी – दादा मला दुरावणार तर नाहीं ? माणसाला एकटं राहतां का येत नाहीं ! मी मत्सरी खास नाहीं; मग असे विचार माझ्या मनांत कां येताहेत ?

माझं मन मी त्याच वेळीं दादाजींना उघडं केलं असतं तर – मी त्यावेळीं भ्यायलें; ती माझीच चूक झाली. पण आतां त्याचा काय उपयोग? एक चूक झाली – आतां या जिवाला जन्मभर अशाच चुका करीत राहिलं पाहिजे. काय वाटेल तें करीन, पण काळूजीबद्दलचं बालपणापासूनचं माझं पवित्र मन मी त्यांना दाखविल्याशिवाय राहणार नाहीं.

---

## प्रवेश तिसरा

[ **स्थळ :** पुतळच्या वाड्यांतील दिवाणखाना. पुतळ उंची बिछान्यावर झोंपली असून उमाजी पुतळच्या तोंडाकडे पहात पलंगाच्या कडेला बसला आहे. चोहोंकडे शस्त्रें लटकत आहेत.]

**उमाजी :** काय हें मोहक सौंदर्य! जाईच्या कळींतला मोहक नाजूकपणा आणि केतकीचा वर्ण हिच्यांत कसा ओतप्रोत भरून राहिला आहे! शेंकडों वर्षे रात्रंदिवस हिच्याकडं पहात राहिलास तरी, उमाजी, तुझ्या डोळ्यांची तृप्ति होणार आहे का? चाफेकळीसारख्या नाजूक दिसणाऱ्या हिच्या नासिकेंतून चंदनाप्रमाणं निघणाऱ्या सुगंधाच्या कैफाचा मोह, उमाजी, तुझ्यासारख्या नागाला कसा सोडवेल? वीरपुरुष सौंदर्यलंपट असतो कीं काय? पुतळ, तुझी लगीनमाळ माझ्या गळ्यांत पडून आज कितीतरी दिवस झाले. इतक्या दिवसांत माझ्या हातून कांहींच कामगिरी झाली नाहीं. आपल्या रूपगुणांनीं मोहून टाकून तूं अशीच का मला स्वस्थ बसवणार? तसा जर तुझा विचार असेल तर माझ्या कर्तृत्वशक्तीचा निकालच लागला म्हणायचा! आज कितीतरी दिवसांत बाहेर काय हालचाली चालल्या आहेत त्यांची मला कल्पनाही नाहीं. मी जर तुझ्या सहवासांत या वाड्याबाहेरील जगाला विसरून गेलों तर माझ्या सवंगड्यांची आणि सैन्याची काय अवस्था होईल? आजवर माझ्या सवंगड्यांपासून कसलाही मोह मला दूर करायला धजला नाहीं; आणि म्हणूनच हा उमाजी सर्वांच्या गळ्यांतला ताईत होऊन राहिला आहे. आजच जर माझं कर्तव्य मी विसरून गेलों तर माझ्यांत जीव तो काय राहिला? पुतळ, कांहीं काळ तरी तुझा हा प्रेमळ करपाश या उमाजीच्या कंठांतून सैल कर आणि मला या वाड्याबाहेर वाघासारखी झेंप घेऊं दे. जागी हो, पुतळ, जागी हो! ( पुतळ उठून बसते. )

**पुतळ :** किती वेळ झाला? कोंबडा आरवलेला मला समजला नाहीं! आपण लवकर जागे झालां तसंच मलाही उठवलं असतं तर कांहीं बिघडलं नसतं! खरंच, आतांशा किनई आपल्याला लवकर जाग येते. भलत्या वेळीं नेहमी असं विचार करीत काय बसायचं?

**उमाजी :** बरोबरच आहे. मी तुझ्यावाणी निष्काळजी कुठं आहे? तुला कसला आला आहे विचार? तूं आहेस या वाड्याची राणी!

**पुतळ :** हो हो तर—मी या वाड्याची राणी, आणि आपण रानचे राजे! पण रानच्या राजाला अगदींच झोंप घ्यावी लागत नाहीं असं नाहीं. दिवसभर गुहेंत पडून तोही अगदीं ढाराढूर झोंप घेतो हें मला पक्कं माहीत आहे.

**उमाजी :** नाहीं कोण म्हणतो? पण पोटाला भूक लागली म्हणजे रानंवनं हिंडण्याकरतां त्याला गुहेच्या बाहेर पडावं लागतं हें माहीत आहे का तुला?

**पुतळ :** हो, सगळं माहीत आहे. त्या शार्दूलाला पोटाकरतां बाहेर हिंडावं लागलं म्हणून ह्या नरशार्दूलाला नको कांहीं अन्नासाठीं भटकायला!

**उमाजी :** नग भटकायला—नग भटकायला? ह्यें लई ब्येस. मंग मस्नी भाकरटुकडा कोन घालील?

**पुतळ :** (स्वगत) हं, नेहमींप्रमाणं मस्नी न् तुस्नी करण्याची लहर आलेली दिसते. (उघड) हें पहा, आपल्याला कांहीं कमी का आहे? एखाद्या राजालाही हेवा वाटण्याइतकी संपत्ती आपण सांठवली आहे. शिवाय या पुतळची संपत्ती आपण अगदीं उधळायचं मनांत आणलं तरी सात पिढ्या संपायची नाहीं.

**उमाजी :** वाः! छान! ह्यें आपल्या बाच्यानंबी व्हनार नाय. अक्षि सोन्याच्या पिंजऱ्यांत पोपट करूनशान ठेवन्याचा हाय व्हय तुझा इचार? लाडकीच हाईस कीं!

**पुतळ :** हो. मी आपली लाडकी मैनाच आहे, नाहींतर काय? हा पोपट माझ्यापासून दूर झाला तर माझ्याच्यानं कसा धीर निघेल?

**उमाजी :** धीर निघल अन् नाय. बिजले, काय येड घेऊन बसलीयास? हा पोपट कवा भुर्रकन् उडून जाईल ह्याचा नेमबी लागायचा नाय बग.

**पुतळ :** ( रागावून ) हो, नाहीं लागायचा ! कांहींतरीच बोलायचं ! एखाद्या पोपटासारखे उडून जा अन् त्या साहेबाच्या हातांत सांपडा; म्हणजे बरं वाटेल. माझ्या ह्या पिंजऱ्यापेक्षां साहेबाचाच पिंजरा आवडेल इकडं !

**उमाजी :** तर तर—साहेबाचा देव आला पाहिजे मला पकडाया !

**पुतळ :** हो, तें सगळं खरं. पण परवांपासून हें अक्षी, भाकर, टुकडा, वानी, पानी—हें काय चालवलं आहे ? मधून मधून असं बोलायची लहर येते वाटतं आपल्याला ?

**उमाजी :** हें बघ, तूं बामनांत वागूनशान लई सोच्च येदावानी बोलाया शिकलीस बघ. मी काय ? रानवट राकूस ! तूं रोज बामनाकडनं पुरानं ऐकनार, तर मी डफतुंतुन्यावर कलगीतुऱ्याचं रामरावनाचं अन् कौरव-पांडवांचं गानं ऐकनार ! तुझी माझी बरोबरी होतीया व्हय ?

**पुतळ :** आपण असं बोलूं नये असं कुठं म्हणतें मी ? उलट हें असं विनोदी बोलणं ऐकून माझा जीव कसा हरखून जातो ! पण एखादे वेळीं, त्यांतून अशा रामपाऱ्यांत असा इतका झटका कुठून येतो म्हणतें मी ?

**उमाजी :** माझ्या पांखरा, मी कोन हाय ह्यें तुम्नी ठावं हाय ना ?

**पुतळ :** माझ्या सर्वस्वावर एका क्षणांत घाला घालणारे आपण कोण आहांत हें का सांगायला पाहिजे !

**उमाजी :** सांगायला नको, पण दरोडेखोरांना सगळ्या भाषांचा सराव ठेवावा लागतो हें समजायला पाहिजे !

**पुतळ :** म्हणजे, आपल्याला किती भाषा येतात तें तरी मला कळूं द्या.

**उमाजी :** मस्नी व्हय ? मोज बोटं.

**पुतळ :** ( हातावर हात घेऊन ) हं सांगा.

**उमाजी :** ( पुतळचीं बोटें आपल्या हातांत घेऊन तीं मोजीत ) हें बघ, एक कोकनस्त बामनाची. एक अक्षी कुनबाऊ. एक उर्दू. अन् वाईच वाईच विंग्रजी.

**पुतळ :** काय ? आपल्याला इंग्रजी येतं ?

**उमाजी :** लई नाहीं येत, वाईच वाईच येतंय्. अन् येनारच. विंग्रजाशीं दोन हात करतुया, तवां म्हटलं—

**पुतळ :** बरं, म्होरं ? ( लाजते. )

**उमाजी :** म्होरं ? हं, या रामपाऱ्यांत मैनालाबी शब्द फुटाया लागलं. हं, किती झाल्या ? एक कोकनस्थ बामनाची, एक अक्षी कुनबाऊ, एक उर्दू, अन् वाईच वाईच विंग्रजी अन् एक – बस इकत्याच मस्नी भाषा येत्यात !

**पुतळ :** नाहीं, आणखी एक राहिली, नव्हे दडवून ठेवली.

**उमाजी :** नाहीं ग बया –

**पुतळ :** नाहीं कशी ?

**उमाजी :** कोनची ?

**पुतळ :** प्रे – मा – ची – !

**उमाजी :** ती भाषा तूंच मस्नी शिकवलीयास नव्हं का ?

**पुतळ :** कुणी मीं ?

**उमाजी :** देवाच्यान्.

**पुतळ :** कांहींतरीच !

**उमाजी :** आतां बघ, या रामपाऱ्यांत कामाची याद द्यायची सोडूनशान मैनावानी प्रेमाची मंजुळ गानीं गात बसलीयास ती !

**पुतळ :** बरं. आतां याद देतें, मग तर झालं ? उठायचं ना ? अगदीं तांबड फुटलं !

**उमाजी :** उठायचं ना म्हणून काय विचारतेस ? बरेच दिवसांत स्वारीवर न गेल्यामुळं पंधरावीस कोसांची मजल मारून येणार आहे मी !

**पुतळ :** म्हणजे ? आज खरोखरच स्वारीवर जाण्याचा बेत दिसतोय् ? मी इतका वेळ थट्टाच समजत होतें ती खोटीच तर ?

**उमाजी :** पुतळ, थट्टा कसली ? आज कितीतरी दिवस मी तुझ्या प्रेमाच्या पिंजऱ्यांत अडकून पडलों आहे. आतां कांहीं काळ मला बाहेर नको का पडायला ? बाहेर माझ्या शत्रूच्या हालचाली काय आहेत, कोण कुठं कसलं कारस्थान करतो, माझ्या लोकांना यापुढं काय हुकूम करायचे, या गोष्टींच्या-कडं मला आतां लक्ष नको का पुरवायला ? रात्रींच मी गंग्याला नवीन मोहिमेचा सुगावा काढण्याकरतां पाठवला आहे. शिवाय कालच माझ्या मानलेल्या बांधवाचा – त्या वीर भुजाबाचा सांगावा आला आहे कीं, माझे

सैनिक माझ्या हुकुमाची तांतडीनं वाट पहाताहेत म्हणून. त्यांना कांहींतरी कामगिरी सांगितली पाहिजे. मी जर असाच ऐषआराम करीत राहिलों तर माझ्या लोकांवरील माझी कदर पार नाहींशी होईल.

**पुतळ :** धनी, मला हें समजत का नाहीं ? पण काय असेल तें असो, आपण आपला जीव धोक्यांत घालूं नये असं मला वाटतं. एखादे वेळीं काय प्रसंग येईल याचा कुणाला अंत लागलाय कां ? वेळकाळ सांगून येत नाहीं धनी !

**उमाजी :** पुतळ, माझ्यासारख्याच्या बायलला हे नेभळे विचार मुळींच शोभत नाहींत. वेडे, आज तुला हें संकट वाटतंय्; पण उभी हयात असल्या संकटांशीं झुंजण्यांत गेली आहे माझी ! जिवावरचे प्रसंग माझ्या पांचवीला पुजले आहेत. असले बायकी विचार सोडून दे. वाघाची मादी वाघासारखीच पराक्रमी असते. तिला शेळीमेंढीचे विचार सुचत नाहींत !

**पुतळ :** नरवीर, आपल्यासारख्या नरसिंहाची मी पत्नी आहें. स्वराज्यकाळीं महाराष्ट्रभर नाचलेल्या देशमुखांच्या पराक्रमी समशेरीच्या सहवासांत माझं बालपण गेलं आहे. संकटाला भिऊन मी हें बोललें असं आपण समजूं नये.

**उमाजी :** अलिकडं गोरगरिबांवर जादा सारा बसवून स्वतःचा खजिना भरण्यांत गुंतलेली देशमुख घराण्याची बुद्धि स्वराज्यकाळीं तलवारीचे डावपेंच करण्यांत गुंतलेली होती हें मला माहीत आहे. पण –

**पुतळ :** पण काय ? आपल्याला त्या पराक्रमाची शंका आली ?

**उमाजी :** ( स्वगत ) ह्याच वेळीं हिची परीक्षा पाहिली पाहिजे.

**पुतळ :** कां ? बोलत कां नाहीं ?

**उमाजी :** शंका येवो अगर न येवो. तुझ्या घराण्याच्या पूर्वीच्या पराक्रमाच्या गोष्टी मला काय सांगतेस ?

**पुतळ :** कां बरं ? आपल्या पतीच्या पराक्रमाचा पत्नीला जसा अभिमान वाटतो त्याचप्रमाणं आपल्या पत्नीच्या तेजस्वीपणाचा पतीला अभिमान नको का वाटायला ?

**उमाजी :** कबूल, कुणी लेकानं नाहीं म्हटलं ? पण पुतळ, माझा पराक्रम जगाला मशहूर झाला आहे, तसा तुझा नाहीं !

**पुतळ :** मग काय, चार दोन घरांवर दरोडे घालून मी दाखवूं आपला पराक्रम? धंद्यानं नसले तरी जन्मानं मी आपल्याच जातीची आहें. आतां घालतें दरोडा.

**उमाजी :** दरोडा घाल, पण तो साध्या घरावर नको. पुतळ, थट्टा राहूं दे. तुला तुझा पराक्रम दाखवण्याची खरोखरच संधी पाहिजे आहे का? पराक्रमी बापजाद्यांकडं बोट दाखवून समाधान मानणारा हा उमाजी नाहीं.

**पुतळ :** धनी, आकाशाला भेदून जाणाऱ्या आपल्यासारख्या शौर्यसागराला ही सरिता मिळाली ती स्वस्थ बसून समाधान मानण्याकरितां नाहीं, तर आपल्याबरोबर उसळी घ्यायला मिळाली म्हणून! धनी, पुतळच्या अभिमानाची छेड करून तिचा अपमान करूं नका.

**उमाजी :** पुतळ, समशेर घासल्याशिवाय चकाकत नाहींच, पण कामही देत नाहीं हें तुला माहीत आहे ना?

**पुतळ :** तें मला माहीत आहे; पण मूळच्या चकाकणाऱ्या या समशेरीला घांसून तिच्याकडून कोणची कामगिरी घ्यायची आहे?

**उमाजी :** कित्येक दिवसांपासून मनांत घोळत असलेल्या विचाराला या लाखाच्या सवालानं वाचा फोडलीस बघ! पुतळ, या उमाजीबरोबर खरोखरच उसळी घेण्याची तुझी इच्छा आहे का? या उमाजीवर तुझं पराक्रमी प्रेम आहे हें जगाला दाखवायचं आहे का? (आंतून तात्याबा "जय यळकोट मल्हार" असा जयजयकार करतो. उमाजीही "जयळकोट मल्हार" असें म्हणतो.) तात्याबा आला वाटतं! (तात्याबा येतो व पूर्ववत् जयजयकार करून मुजरा करतो.) काय, तात्याबा, काय खबर आहे? आमच्या टोळींत आल्यापासून तुला कसं काय वाटतं?

**तात्याबा :** लई रुबाब वाटतोयान् काय?

**उमाजी :** हो, पण साहेबाच्या छावणींतली खबर काय आहे?

**तात्याबा :** खबर लई भयंकर हाय!

**उमाजी :** मग बोल लवकर.

**तात्याबा :** साहेबाच्या राहूटीकडं काळूजी घिरट्या घालूं लागला हाय.

**उमाजी :** ऐक, पुतळ, तुला कामगिरी कशी नामी आली आहे! पहा हिय्या करून.

**पुतळ :** आपली आज्ञा असेल तर काळाच्या जबड्यांत उडी घ्यायला क्षणभरही कचरणार नाहीं.

**उमाजी :** अस्सं! नीट विचार कर.

**पुतळ :** काय ती आज्ञा व्हावी.

**उमाजी :** ठीक, ऐक तर मग. हें पहा, काळोजीला दुखवून त्याला मीं जिजाच्या शब्दावरून अन् मल्हारीमार्तंडाच्या शपथेमुळं जिवंत सोडला ही गोष्ट माझ्या मनाला सारखी डांचत असते. तो हरामखोर माझ्याविरुद्ध कांहीं तरी कारस्थान केल्याशिवाय राहणार नाहीं, असा मला राहून राहून संशय येतो. तेव्हां धीर होत असेल तर त्याच्या मागावर राहून पहा त्याच्या वागणुकीचा कांहीं अंत लागला तर!

**पुतळ :** ठरला निश्चय या पुतळचा. आपण सांगितल्याप्रमाणं काळूजीच्या कारस्थानाचा माग लावीन तरच नांवाची पुतळ!

**उमाजी :** हां, छान! आतां माझी खरी अस्तुरी शोभतीयास बघ. असा कांहींतरी मोठा चंग बांध. हो, नाहींतर आधींच सांगून ठेवतों, एखाद्या मोलकरीणबाईला शेतांत बेणायला म्हणून बरोबर घेऊन जाशील आणि तिचा विळा नाहीं तर कोयता चोरून आणून दाखवशील मला आपला पराक्रम!

**तात्याबा :** हां जी हां! (हंसतो.)

**उमाजी :** बरं तात्याबा, आणखी कांहीं खबर?

**तात्याबा :** साहेबाचं शिपाई आपल्या मागावर कसे कुत्र्यावानी हायती. नायकांनीं अक्षी जपून असावं.

**उमाजी :** बस इतकंच?

**तात्याबा :** अन् हो–नाईकसाब, ह्यें बघा, साहेब आपल्यावर टिपन साधून असला, तरी आपल्या सूरपनाला त्यो लई नांवाजतो. उमाजी

नाईकासारखा पराक्रमी पुरूस आपन पाह्यला नाय, त्यो आपनांस्नी मिळाला पाहिजे, असं हरघडीला म्हंतो आमचा साब.

**उमाजी :** अस्सं! तर मंग मला मिळवूनशान ममईचा गवनेर नाय तर इलायतचा राजा कर म्हणावं साहेबाला.

**पुतळ :** काय ही थट्टा!

**तात्याबा :** नाय, मी म्हंतों, नाईकसाब, आपून कुंपणी सरकारच्या विच्छेपरमाणं येखादी मानाची जागा मिळवूनशान स्वस्थपनानं आनंदांत दिस काढलं तर काय वाईट व्हईल, नाईक?

**उमाजी :** काय वाईट होईल? तात्याबा, काय वाईट होईल म्हणून काय विचारतोस? या उमाजीच्या हृदयांत कसलं तुफान भडकतंय् याची तुला कल्पनाही नाहीं. दोस्ता, स्वस्थपणांत आनंद मानणारा हा उमाजी नाहीं. साहेब मला नांवाजतो अन् साहेबाचे गुण मला माहीत नाहींत असं का तुला वाटतं? अरे, वीरांची पूजा वीरांनींच करावी. साहेब चांगला आहे, चतुर आहे. पण त्याचा या उमाजीला कांहींएक उपयोग नाहीं! मनगटाच्या जोरावर स्वतंत्रपणानं राहाणं हाच या उमाजीचा खरा जिवंतपणा आहे. साहेबाची नोकरी मोठ्या मानाची असली तरी तिचा या स्वतंत्र उमाजीला कांहींएक उपयोग नाहीं, समजलास?

**गंगाराम :** (शिपायाच्या वेषांत धांवत प्रवेश करतो.) मामा, मामा, खोल दरीच्या वाटेनं खजिन्याच्या पेट्या पुण्याकडं जाणार असल्याची नक्की बातमी लागली आहे.

**उमाजी :** तें खर, पण, पोरा, हा सोजराचा पोषाख कुठून मिळवलास?

**गंगाराम :** साहेबाच्या गोटांतून मिळवला, मामा. गोटांत शिरून बातमी काढावी लागली, नव्हं का?

**उमाजी :** ठीक. मग आतां पुढच्या कामाला लाग. तात्याबा, जा तूं. आणि पुतळ, तूंही आपल्या उद्योगाला लाग. अन् हो, माझ्याकरतां पिऱ्याला एक घोडा तयार ठेवायला सांग. घटकाभरांत निघालोंच मी मोहिमेवर!

[ गडबडीनें सर्व निघून जातात. ]

---

## प्रवेश चौथा

[**स्थळ :** जिजाचें घर. नेहमींच्या नाईकाच्या पोषाखांत काळोजी प्रवेश करतो. ]

**काळोजी :** ( प्रवेश करून ) कोण आहे घरांत ? जिजा, जिजा —

**जिजा :** ( आंतून ) कोण आलंय् ?

**काळोजी :** मी काळोजी आलोंय्. ( जिजा प्रवेश करते व कांहीं न बोलता उभी राहते. ) कां ? आवाज ओळखीचा वाटला नाहीं वाटतं ? ( जिजा बोलत नाहीं असें पाहून ) पहिलाच सपाटा असा रागाचा येणार असं मला वाटलंच होतं ! आणखी काय काय ऐकावं लागेल ह्या विचारांत दिव्याचा घाट केव्हां संपला याचं भानच राहिलं नाहीं. पण काय सांगूं, जिजा, झालेल्या प्रकारामुळं तुला तोंड दाखविण्याची छातीच होईना मला. मी होतों कसा आणि झालों कसा ? या एका विचारावांचून मला रात्रंदिवस चैन पडत नाहीं बघ ! मानी पुरुषाला अपमानाच्या यातना सहन करीत राहणं जिवावर येतं. खरंच, जिजा, तूं त्या दिवशीं मला वांचविलं नसतंस तर हें काळं तोंड दाखविण्याचा प्रसंग माझ्यावर आला नसता !

**जिजा :** शेळी जाते जिवानिशी अन् खाणार म्हणतो वातड ! वाः ! फार छान ! हे असले रडवे उद्‌गार ऐकण्याकरतां का मी वाटेकडं डोळे लावून बसलें होतें ?

**काळोजी :** असे उद्‌गार काढूं नको तर काय करूं ? आजवर या काळूजीनं काडीइतकाही अपमान सहन केला नाहीं ! असल्या मेलेल्या जिण्यापेक्षां मी त्या दिवशींच जर जगाला रामराम ठोकला असता, तर दुनिया काय ओस पडली असती ?

**जिजा :** काळूजी, अशा या बोलण्यानं जिजीच्या हृदयाला तुम्ही घरें पाडतां आहां. आपल्या एकमेकांच्या जिवाचे धागे, का कुणास ठाऊक, एकमेकांत अगदीं गुंतून जाऊन त्यांचा एकजीव झाला आहे हें तुम्ही विसरतां ! उगीच कांहीं कुणी कुणासाठीं तळमळत नाहीं, बरं का ! आपल्या जिवाचं जर कांहीं कांहीं बरं वाईट झालं असलं, तर दुसऱ्या कुणाचं जग ओस पडलं नसतं; पण या जिजीचं जग मात्र खरोखर ओस पडलं असतं. काळूजी, इतक्या

दिवसांची आपल्याबद्दलची माझी आस्था मीं कितीतरी वेळां आपल्याला दाखविली नाहीं का? मी या घरांत पडलें म्हणून आपण इतके दिवस माझ्याकडं दुर्लक्ष करीत आला! पण लहानपणापासून मी आजपर्यंत आपल्याला विसरलें नाहीं. काळूजी, माझ्या निर्मळ भाबड्या प्रेमाकडं इतक्या निर्दयपणानं पहाणं आपल्याला बरं दिसतं ना?

**काळोजी :** (स्वगत) जीवदान देऊन ही बया पुन्हां अशा रीतीनं माझा जीव घेणार असं मला वाटलंच होतं! मीं झिडकारून टाकलेली ही घोरपड पुन्हां माझ्याच गळ्यांत पडणार — पण याच भाबड्या घोरपडीच्या साहाय्यानं मला माझ्या कारस्थानाचा कडा चढला पाहिजे.

**जिजा :** जेव्हां जेव्हां मी हा विषय काढतें, तेव्हां तेव्हां कसं अगदीं सुन्न होऊन उभं राहणं होतं! इतका कसला विचार पडतो कुणाला माहीत? मी समोर आलें म्हणजे विषारी सुरईच समोर आल्यासारखं वाटतं ना? काळूजी, इतकी जर मी शुकदेवाची विनवणी केली असती तर तोदेखील मला प्रसन्न झाला असता; पण तुम्ही मात्र —

**काळोजी :** अगदीं दगड आहे असंच तुझं म्हणणं? वाः! फारच चांगली पारख केलीस या काळूजीची! अन् मी म्हणतों तूं जर मला या बाबतींत दगड ठरवलंस तर त्यांत तुझा काय दोष? हो, आजपर्यंत मी तुझ्याशीं तसाच वागत आलों आहें. पण काय सांगूं? जिजा, माझी चूक मला समजायला अन् उमाजीनं माझ्यावर तसा प्रसंग आणायला एकच गांठ पडली.

**जिजा :** माझा अव्हेर करण्यांत झालेली चूक पटून आपण ती सुधारण्याचा विचार —

**काळोजी :** केला होता. पण आतां काय त्याचं? राणोजी नाईकाची म्हणजे माझ्या मित्राची तूं बाईल, म्हणून पूर्वी माझं मन कचरत होतं. पण तुझं या काळूजीवरचं खरंखुरं मन पाहून माझ्याही मनांत तुझ्याबद्दल कळवळा येऊं लागला होता; पण —

**जिजा :** आतां काय झालं?

**काळोजी :** तो अंकुर पार पळून गेला! माझ्या इच्छेला, माझ्या महत्त्वाकांक्षेला, माझ्या या पुढल्या आयुष्याला निराळंच वळण लागलं!

**जिजा :** कोणचं तें वळण ? सांगा, सांगा, काळूजी. तुमच्या आयुष्याचं वळण मला समजूं द्या. झाली तर तुमच्या मार्गांतली अडचण दूर करण्याची मी जिवापाड खटपट करीन.

**काळोजी :** जिजा, या काळूजीच्या विचारांत अन् मनाच्या भावनांत किती फरक पडलाय् याची तुला कल्पना नाहीं! तूं माझ्याकरतां खटपट– पण खरं सांगूं, जिजा ? जगाचा आंधळा व्यवहार पाहिला म्हणजे माझा कुणावरही विश्वासच बसत नाहीं त्याला मी काय करूं ?

**जिजा :** हें काय निराळंच बोलणं काढलं ? काय काय वेदांत ऐकायला मिळेल त्याचा कांहीं अंत लागलाय का ? जळलं मेलं तें वाटणं ! नेहमीं कसे अगदीं एखाद्या पोरासारखे असतां अन् मला पाहिलं म्हणजेच कसं म्हातारपण येतं अन् वेदांत सुचतो ?

**काळोजी :** कां सुचूं नये ? (अडखळत) वैऱ्याची बहीण, मित्राची बायको–

**जिजा :** पुन्हां तेंच ! अहो, ते तुमचे मित्र होते ते गेले, पण तुम्ही माझे बालपणापासूनचे मित्र जिवंत आहां ना ? हें पहा, अशा रीतीनं या जिजाच्या हृदयांत आपल्या कसाबकरणीची कट्यार खुपसायची असली तर ती प्रत्यक्षच खुपसून मला मारून टाका; पण माझे असे हाल करूं नका! कुणावर विश्वास नाहीं का? माझ्यावर–तुमच्याकरतां रात्रंदिवस हळहळणाऱ्या या जिजावर तुमचा विश्वास नाहीं ?

**काळोजी :** जिजा, असा त्रागा करण्यांत अन् रडण्याओरडण्यांत कांहींच अर्थ नाहीं. प्रेमाच्या नुसत्या फुकाच्या गोष्टींचा मला अगदीं कंटाळा आला आहे !

**जिजा :** फुकाच्या गोष्टी ? काळूजी, तुम्हांला या फुकाच्या गोष्टी वाटतात ? तुमच्यावरील माझ्या जिवाची कसोटी कोणत्या तऱ्हेनें दाखवूं तेवढं मला सांगा. एका क्षणाचाही विलंब न लावतां तुमचा मोतीमोलाचा शब्द झेलायला ही जिजा कचरणार नाहीं.

**काळोजी :** (स्वगत) माझा बेत हिला सांगितला तर ही बया एकदम बिनसायची. तेव्हां वळणावळणानं, वळणावळणानं पाणी हलकें बांधून आणायला हवं.

**जिजा :** काळूजी, कसला विचार चाललाय् तुमचा? कसलं दिव्य करायला मला सांगतां?

**काळोजी :** तुझ्या दिव्यांतून तूं कशी पार पडशील याचा विचार चाललाय् माझा!

**जिजा :** तो कां?

**काळोजी :** परवांचा प्रसंग आला नसता तर तुला अशी कसोटीला लावण्याचं कारणच पडलं नसतं. पण, जिजा, खरं अन् स्पष्ट सांगायचं म्हणजे तुझ्या हृदयाचा अर्धा भाग जरी या काळूजीच्या प्रेमानं व्यापला असला तरी बाकीचा भाग उमाजीच्या बंधुप्रेमानं व्यापला आहे. जिजा, या काळूजीची गोष्ट तशी नाहीं! याचं हृदय तुझ्याबद्दलच्या प्रेमानं ओतप्रोत भरलं आहे; त्यांत तुझ्याशिवाय दुसऱ्या कुणालाही थारा नाहीं. त्याचप्रमाणं तुझ्याही हृदयांत माझ्याशिवाय कुणालाही थारा मिळतां कामा नये! माझ्याच विचारानं तूं चिरनंदांत मग्न झाली पाहिजेस. आहे कबूल?

**जिजा :** चमत्कारिक प्रश्न टाकून थक्क केलंत मला! तुम्हां दोघांवरील माझ्या प्रेमांत जमीनअस्मानाचं अंतर असतां तुम्ही असा प्रश्न केलांत याचा मतलब?

**काळोजी :** मतलब इतकाच कीं, माझ्या प्रेमविषयानं माझ्या वैऱ्याशीं कोणच्याही तऱ्हेनं संबंध ठेवतां कामा नये. जिजा, मी मनुष्य आहें; मानापमानाच्या भावनांनीं मला सोडलेलं नाहीं.

**जिजा :** नसेल सोडलं, म्हणून आम्हा बहीणभावंडांत अंतर पाडून तुम्ही कोणता फायदा मिळवणार आहां? दादाचं माझ्यावर प्रेमच नव्हे, तर जिजाला आपला भाऊ म्हणजे एक छत्र वाटतं! मला कांटा टोचला तर दादाच्या पायाला रक्त येतं हें तुम्हांलाही बालपणापासून माहीत आहे. तेव्हां अशा आम्हा बहीणभावंडांची ताटातूट करण्यांत तुम्ही किती निर्दयपणा दाखवतां आहां याची तुम्हांला कल्पना तरी आहे का?

**काळोजी :** किती भोळसट विचार हे! जिजा, तुझ्या या मूर्खपणाच्या कल्पना ऐकल्या म्हणजे हंसावं कीं रडावं तेंच समजत नाहीं. मला कांटा टोंचला तर दादाला रक्त येतं म्हणे! अगदीं मूर्ख आहेस तूं! मला वाटलंच

कीं, तूं कांहीं माझ्या कसोटीला उतरणार नाहींस म्हणून! भावाच्या पंक्तीला चांदीचा थाळा मिळाला कीं, भावाचं आपल्यावर प्रेम आहे अशी झाली समजूत! छेः छेः छेः छेः! या बायकांच्याइतकी मूर्ख आणि बावळट जात जगांत कुठं सांपडायची नाहीं!

**जिजा :** एकूण तुमचं म्हणणं काय?

**काळोजी :** म्हणणं इतकच कीं, दादाबद्दल तू आंधळी आहेस! वेडे, जगांत स्त्रीपुरुषसंबंधाशिवाय दुसरं प्रेम नाहीं. उमाजीचं आपल्या पुतळवर प्रेम आहे. माझं तुझ्यावर, तसं त्याचं त्याच्या त्या बयेवर प्रेम आहे. त्यानं आतां तुला कायमचं सोडलं! तूंही त्याला सोड अन् या काळूजीचा हात धरून सुखांत संसार कर. उमाजी तुला आतां कोपऱ्यांतल्या कचऱ्याचीही किंमत देणार नाहीं, समजलीस?

**जिजा :** हें पहा, काळूजी, ही जिजा आपल्या सहवासाकरतां तळमळत असली म्हणून हिला वाटेल तें ऐकवूं नका! ह्या प्रेमाचा अन् या माझ्या बंधुप्रेमाचा संबंध काय? दादाबद्दल तुम्हांला हेवा वाटण्याचं कांहींच कारण नाहीं! दोन्ही प्रेमांची जात अगदीं भिन्न आहे. भलतंच कांहींतरी सांगून आमच्यांत अंतर पाडतां होय?

**काळोजी :** घ्या! तुमचं जर खरंच प्रेम असलं तर मीच काय, देवाचा देव आला म्हणून त्यांत थोडंच अंतर पडणार! भावाबद्दल जर तुझी भोळी समजूत असली तर तूं मला सोडूं नयेस एवढंच माझं म्हणणं.

**जिजा :** पुन्हां मेलं तेंच! अहो एकदम दादाला मी सोडीन कशी? माया, कृतज्ञता या भावना मला आहेत का नाहींत? हें पहा, तुम्हांला माझ्या प्रेमाचा स्वीकार करायचा नाहीं हेंच खरं! म्हणे मी तुला पाहिजे असेन तर दादाला सोड. कशाला कांहीं ताळमेळच नाहीं! पायाला ठेंच अन् डोईला बिब्बा! अन् मी म्हणतें आमच्या बहीणभावंडांच्या प्रेमाबद्दल काय माहीत आहे हो तुम्हांला?

**काळोजी :** हें पहा, त्याच त्या गोष्टीबद्दल वायफळ वाच्यता नको. मौजच पाहायची तुझी इच्छा आहे का?

**जिजा :** होय, आहे. तेवढ्यापुरतंच तुमचं नडलं असेल तर होऊं द्याच त्याचा निकाल!

**काळोजी :** होऊं दे तर होऊं देच !

**जिजा :** काय पुरावा पाहिजे तुम्हांला ?

**काळोजी :** पुरावा कशाला ? घोडामैदान अगदीं जवळ आहे. अगदीं सोपी युक्ति आहे त्याला !

**जिजा :** ती कोणती ?

**काळोजी :** परवां पुतळच्या जवाहिरांत उमाजीच्या हातीं आलेला अन् आज त्याच्या दंडावर असलेला कंठा मागून आणून तूं माझ्या गळ्यांत घालावास हीच ! त्याचं तुझ्यावर जर खरं प्रेम असेल तर तो कंठा तुला मिळेलच, अन् मग मीहि तुला जास्त आग्रह करणार नाहीं. पण जर का तो जिन्नस तुला मिळाला नाहीं तर मात्र आपल्या भावाचं आपल्यावर प्रेम नाहीं असं कबूल करून आपला भाऊ संपला – संपला म्हणजे तुला संपला – बाकी तो जगांत खुशाल सुखाचा नांदो ! यापुढं मला काय करायचंय् त्याच्याशीं म्हणा ! तूं तेवढी त्याच्याशीं फटकून वागायला तयार असली पाहिजेस एवढीच माझी इच्छा.

**जिजा :** हात्तिच्यारे ! एवढीच का तुमची इच्छा ?

**काळोजी :** मग दुसरं काय म्हणतों मी ?

**जिजा :** डोंगर पोखरून उंदीरच निघाला म्हणायचा ! काळोजी, तुमच्या समाधानाला कांहीं फारसा वेळ नको. पण हें पहा –

**काळोजी :** कांहीं पहायला नको. एवढं केलंस कीं बस.

**जिजा :** हो, पण कंठा आणल्यावर –

**काळोजी :** जर मी तोंडून शब्द काढला तर तुझा गळा – एका गायीचा गळा कापल्याचं – गोहत्येचं पातक लागेल मला. आतां कांहीं राहिलंय् ?

**जिजा :** तर मग मी चार दोन दिवसांत दादाकडे जातें अन् तो कंठा घेऊनच येतें. काळूजी, लक्षांत ठेवा, तो कंठा आणीन तरच राहीन ! त्याशिवाय तोंड नाहीं दाखवणार !

**काळोजी :** ( स्वगत ) तो कंठा तुझ्या बापाला मिळत नाहीं ! ( उघड ) बरं जातों मी. ( जिजा मानेनं संमती देते. ) ( स्वगत ) आतां जाऊन साहेबाची पाठ धरली पाहिजे ! ( दोघेही जातात. )

---

## प्रवेश पांचवा

[ **स्थळ :** खोल दरी. लांबून महारी वाजंत्री वाजत आहेत. ती बंद होतांच उमाजी, गंगाराम व त्यांचे अनेक सैनिक प्रवेश करतात. ]

**गंगाराम :** मामा, आतां हळहळण्यांत काय फायदा ? आधीं अविचारानं कांहींतरी करायचं अन् मग हळहळत बसायचं हें या गंग्याला बिलकुल पसंत नाहीं ! पुतळ मामीला तुम्ही काळूजीसारख्या कर्दनकाळाच्या मागावर पाठवलंत हीच मुळीं चूक झाली ! उपाशीतापाशी उन्हातान्हांत रानंवनं फिरण्याची तिला संवय आहे होय ? अन् काळूजीशीं प्रसंग आहे तो ! मामा, हा गंग्या तुमच्यासमोर कधीं बोलला नाहीं; पण पुतळ मामी गेल्यापासून आपल्याला बोलल्याशिवाय राहावत नाहीं अन स्वस्थही बसवत नाहीं या खोल दरींत ! ( सैनिकांस ) जा रे, टेहळणी ठेवा ! ( गंगारामच्या खुणेनें सर्व सैनिक मुजरे करून निघून जातात. )

**उमाजी :** पोरा गंग्या, फार नाहीं पण थोडीशी चूक झाली खरी माझ्या हातून ! पण आतां ती ध्यानांत येऊन काय उपयोग ? पुतळ इतका कांहीं अविचार करील याची मला कल्पना नव्हती ! रोज कांहीं ना कांहीं निरोप पाठवून आपण काय करतों, कुठं आहों हें ती कांहीं तरी कळवील अशी मला आशा होती; पण तिनं जी दडी मारली ती मारली ! निरोप नाहीं कीं थांगपत्ता नाहीं ! काय झालंय् देवाला माहीत !

**गंगाराम :** इतकंही करून तुम्ही तिच्या संगतीला एखादा हत्यारबंद माणूस तरी द्यायचा ! पण तेंही नाहीं. तात्याबाच्या भिमाला बरोबर घेऊन ती गेली. मामा, तुम्हांला कांहींच कसं सुचलं नाहीं ? आपल्याच हातानं आपला जीव अगदीं घोरांत पाडून घेतलांत, मामा !

**उमाजी :** हें बघ गंग्या, आतां नुसती काळजी करण्यांत काय अर्थ ? त्यांतनं मी म्हणतों, तूं पुष्कळ हळहळलास अन् मला लागेल तितकं बोललास म्हणून पुतळ आपल्याला गवसणार आहे होय ? तिच्या धाडसाची उसळी पहायला म्हणून गेलों अन् असा फशीं पडलों !

**गंगाराम :** फार छान केलंत !

**उमाजी :** खरं म्हणशील तर, गंग्या, धाडसांत जिवावरचे खेळ खेळल्यावांचून या तुझ्या मामाला चैनच पडत नाहीं बघ! पोरा तुलासुद्धां पोरगी बघायची ती वाघाच्या मिशा उपटणारी बघणार आहें बघ! (गंगाराम किंचित हंसतो.) अरे, तळहातावर शिरं घेऊन रानोमाळ घुमणारे आपण. आपणांस्नी असल्याच पाहिजेत आस्तुऱ्या!

**गंगाराम :** तें खरं मामा! पण पुतळ मामीकडं आतां लक्ष पुरवलंच पाहिजे! उगीच कुठंतरी जाईल उसळीच्या भरांत अन् जिवावरचं संकट ओढवून घेईल. म्हणून म्हणतों, मामा, साहेबाच्या खजिन्याची अन् दुसऱ्या कसल्या मोहिमेची आशा सोडून आपण पुतळ मामीच्या शोधाला जावं हें उत्तम! सकाळीं पलीकडच्या डोंगरांतून जाणारा खजिना आम्हीं लुटला; पण आम्ही त्यांत सपशेल फसलों–रिकाम्या पेट्या हातीं आल्या!

**उमाजी :** पोरा गंग्या, तूं अजून बच्चा आहेस! तुला समजायचा नाहीं या साहेब लोकांचा कावा! या उमाजीला मात्र तो पुरेपूर माहीत आहे! लेका, आपल्याला हुलकावणी दाखविण्यासाठीं सकाळच्या पेट्या मोकळ्या पाठवल्या साहेबानं! रिकाम्या पेट्या पलीकडच्या डोंगरांतून नेऊन आपल्याला हुलकावणी दाखवायची अन् खजिन्यानं भरलेल्या पेट्या डोल्यांत भरून या खोल दरीच्या वाटेनं पुण्यास पोंचवायच्या, असा आहे साहेबाचा डाव! पोरा, बघ तर खरं माझी करामत! आपल्या लोकांना बंदुका, गोफणी अन् तरवारी सरसावून हुषार राहण्याचा इशारा दे.

**गंगाराम :** तें मी करतों. पण मामा, दिव्याच्या घाटांतून साहेबाच्या छावणींतली खबर द्यायला तात्याबाला तुम्ही या खोल दरींत बोलावलं होतं ना? त्यानं यापूर्वीच यायला पाहिजे होतं! काय घोटाळा झालाय् कांहींच समजत नाहीं!

**उमाजी :** अरे खरंच! गंग्या, तात्याबा अजून कसा आला नाहीं? (आंतून आरडाओरड व कांहीं आर्तस्वर ऐकूं येतात.) काय रे पोरा, हा दंगा कसला?

**गंगाराम :** हां! बराबर.

**उमाजी :** काय रे पोरा?

**गंगाराम :** मामा, दोन हजारांची साटीण घेऊनशान् एक ऐतखाऊ विजापूर-कडून ममईला जाणार होता —

**उमाजी :** त्याला गांठला वाटतं आपल्या सैन्यानं !

**गंगाराम :** हो वाटतं !

**उमाजी :** चल चल, पाहूं तर खरं ! ( मागचा पडदा वर जातो. दोघे बाल वधूवर उभे असून त्यांच्याबरोबर दोन पुरुष व दोन बायका आहेत. 'चला नाईकांच्या म्होरं' असें वरचेवर म्हणून उमाजीचे लोक त्या सर्वांना ढकलीत व मारीत असून ते लोक त्यांच्या विनवण्या करताहेत असें उमाजीस दिसतें.) हं सबूर ! ( उमाजीचे सर्व लोक उमाजीस 'जय यळकोट मल्हार' म्हणून मुजरे करतात.) काय गडबड आहे ?

**पिऱ्या :** नवरीला घेऊनशान् ह्यो नवरदेव घरीं चाललाया. ह्येचींच हीं पोरं दोघंबी इवाई पकडल्याती. बाकी समदी वरात उधळून टाकली नाईकसाब ! ह्येसनी आपल्याम्होरं आनल्याती. काय ती आज्ञा होवी !

**उमाजी :** कुणाचं लगीन आहे रे ?

**रामजी :** ( मुजरा करून ) माझ्या घरचं लगीन हाय, नाईकसाब !

**उमाजी :** ( ओळखून ) कोण, राजेवाडीचा रामजी ?

**रामजी :** जी व्हय.

**उमाजी :** पोराचं लगीन काढलयास व्हय ?

**रामजी :** जी नाईकसाब, दया व्होवी !

**उमाजी :** वेड्या, दया कसली ? तुम्हांला रे कोण काय करतो ? पिऱ्या सोड समद्यांस्नी अन् माझा दरवडेखोराचा आहेर कर पोरांस्नी ! (पिऱ्या दागिन्यांची पेटी पुढें करतो. उमाजी त्यांतील कांहीं दागदागीने त्या वधूवरांच्या गळ्यांत घालतो. )

**रामजी :** इकतं दागिनं स्वप्नांतबी नव्हतं पाहिलं ! पोरांनो, दंडवत घाला नायकांना ! ( दोन्ही पोरें पायां पडतात. )

**उमाजी :** जा, मल्हारीच्या राज्यांत आनंदानं नांदा ! पोरा, बायलला घरीं घेऊन चाललास ; तिचं नांवा घ्याया तुला सांगितलं असतं, पन माझी बाईल पळून गेलीया – तिला हुडकण्याच्या खटपटींत आहें मी ! लै फिकिरींत हाय बघ. जा, पिऱ्या, बिनघोर जाऊं दे समद्यांस्नी ! (सर्व जातात. तात्याबा आंतून

'जय यळकोट मल्हार' म्हणून ओरडतो.) जय यळकोट मल्हार! तात्या आला वाटतं! (तात्याबा येतो व मुजरा करतो.) तात्याबा, पुतळ तुला कुठं दिसली का?

**तात्याबा :** पुतळची याद आहे म्हणायची नाइकांना!

**उमाजी :** तात्याबा, तुला कांहीं तरी माहीत आहे खास!

**तात्याबा :** छेः बा! (किंचित हंसतो.)

**गंगाराम :** छेः बा? चेहराच सांगतोय् तुझा! लई चघळपणा करूं नगस! सांग काय तें.

**उमाजी :** तात्याबा, दोस्ता, या उमाजीच्या जिवाकडं बघ. पुतळकरतां जीव टांगून गेलाय् माझा!

**तात्याबा :** नाईकसाब, काय सांगूं? साहेबाच्या छावणींत हाय पुतळ.

**उमाजी :** (उसळून) काय पुतळ पकडली गेली? तात्याबा, पुतळवर कसलं संकट तर आलं नाहीं ना?

**तात्याबा :** आज संकट नाय पन कवा येईल त्येचा नेम नाय.

**उमाजी :** तें कसं, तात्याबा?

**तात्याबा :** नाईक, काय सांगूं तुम्हांला? काळूजी नाईक आपल्या सैन्यांतून फुटला हें आमच्या साहेबाला कळतांच त्येला आपलासा करून घेन्याच्या खटपटीमंदी होता आमचा साहेब.

**उमाजी :** बरं, मग?

**तात्याबा :** उमाजीला पकडून देनारा त्यो काळोजीच बनलीया आपली पुतळ.

**उमाजी :** काय, पुतळनं काळोजीचं सोंग घेतलंय्?

**तात्याबा :** व्हय. पुतळ काळूजी बनलीया, अन् माझी बायकु भिमा त्या काळूजीची बायको बनलीया. त्यांतून साहेबाला हाय चितुर काढण्याचा नाद! वरच्या इलायतच्या साहेबाकुन तुमचं चितुर काढून पाठवन्याचा त्येला हुकूम झालाया. तवा रंग नासन्यांत अन् कागूद खराब करन्यांत मजेंत दिस काढत्यात न् काय! मीच साहेबापोतर त्येंची दाद लावून, दिल्या नव्हं का ढकलून आंत!

**उमाजी :** अस्सं ! अस्सं ! ! तुझ्या बायलचा दादला बनूनशान, साहेबाच्या टेबलावर पाव भिस्कूट खाया शिकतीया व्हय पुतळ ?

**तात्याबा :** व्हय, व्हय. पन कवा दादलपणा बाहीर फुटंल त्येचा नेम नाय हं !

**उमाजी :** तें कसं, तात्याबा ?

**तात्याबा :** कारण काळूजी साहेबाशीं संधान बांधून त्यांचा कांहींतरी घात केल्याबिगर राहणार नाय. नाइकांनीं सावध राहावं !

**उमाजी :** म्हणजे ? काळूजी साहेबापर्यंत पोहोंचून –

**तात्याबा :** नाय ! मी मधीं असल्यामुळं त्याला घा पांच येळां धुडकावून लावला. पन आतां काय तरी दंडेली करूनशान् त्यो साहेबापोतर आल्या-बिगर राहणार नाय.

**उमाजी :** बरं, तूं आतां बिनघोर जा.

**तात्याबा :** मी आतां हाकडनं जात नाय.

**उमाजी :** कां रे ?

**तात्याबा :** तिकडनं साहेबाचा खजिना येतोय्, तवा मी खालच्या खंडारातनं जातों.

**उमाजी :** बरं, जा तूं. ( दोघेही जयजयकार करतात. तात्याबा जातो. )

**गंगाराम :** मामा, पाव भिस्कुट खाऊन माणसं खिरिस्ताव होतात असं मीं ऐकलं आहे.

**उमाजी :** वेडा आहेस तूं पोरा गंग्या ! पाव भिस्कूट खाऊन अन् पानी पिऊन मानूस कुठं खिरिस्ताव होतया व्हय ? अन् मी म्हणतों, झाली पुतळ खिरिस्ताव तर झाली ; घेऊं बामनाकडनं सूद करून. हाय र काय त्यामंदी ? गंग्या, थट्टा राहूं दे. चल, आटप लौकर ! आतां आपल्याला पुढच्या कामाकरतां कंबरा कसल्या पाहिजेत. पुतळचा शोध लागला, आतां माझ्या अंगांत मल्हारीचा संचार झाला आहे. कसल्याही संकटाला हा उमाजी डगमगत नाहीं ! तूं मात्र मी सांगतों त्याप्रमाणं व्यवस्था कर. एक केसभर चुकलास तर सर्वांचा घात होईल !

**गंगाराम :** मामा, मलाही आतां कसा आवेश चढला आहे! तुम्ही सांगाल त्याप्रमाणं वागायला मी माझ्या टोळीसह तयार आहे. आज्ञा व्हावी.

**उमाजी :** हें बघ पोरा, (दूरवर पाहून) तो बघ झाडींतून खजिना येतोय! त्याच्यावर हल्ला करून मी तो लुटतों अन् आपल्या भुयारांत नेऊन गुदरतों. तूं याच पोषाखांत साहेबाच्या छावणीभोंवतीं घिरट्या घालीत राहा. मी हरयुक्ती करून साहेबाच्या गोटांत प्रवेश करून अन् काळूजीची हालचाल प्रत्यक्ष डोळ्यांनीं बघून पुतळला घेऊन आलोंच म्हणून समज!

**गंगाराम :** पण छावणींत जाणार कसं तुम्ही?

**उमाजी :** तें मग सांगतों तुला – आधीं तो खजिना आला बघ!

**गंगाराम :** हो पण मामा, पुतळ मामीबद्दल –

**उमाजी :** बोहल्यावर तिचा हात धरून उभा राहिलों त्याच वेळीं तुझ्या मामीचं रक्षण करण्याचं कंकण या तुझ्या मामानं बांधलं आहे. पोरा, असा गडबडून जाऊं नकोस! ती बघ आलीच खजिन्याची डोली!

[दोघेही "जय यळकोट मल्हार" म्हणून जयजयकार करून दोन्ही बाजूला जातात. कांहीं मावळे डोली घेऊन प्रवेश करतात. त्यांच्याबरोबर कांहीं शिपाई व सोल्जर असतात. उमाजीच्या लोकांची व शिपायांची निकराची लढाई होते. उभयपक्षाचे लोक पडतात. उमाजी डोली ताब्यांत घेतो व "डोली घेऊन पुढें चला" असें मावळ्यांना फर्मावतो. ते चालू लागतांच तो पूर्ववत् जयघोष करतो. पडदा पडतो.]

---

## प्रवेश सहावा

[**स्थळ :** दिव्याच्या घाटांतील कॅप्टनची छावणी. कॅप्टन मॅकिन्टॉश अनेक सोल्जरांसह प्रवेश करतो. काळोजीच्या वेषांत पुतळ बरोबर असते. कॅप्टनचा इशारा होतांच, सलाम करून सोल्जर निघून जातात.]

**पुतळ :** साहेब, आज उमाजीचा शोध मला लावून देतां आला नाहीं, याबद्दल मी दिलगीर आहें. मला वाटतं तो आज पुरंदरकडं किंवा कात्रजकडं

गेला असावा. आतां आपण काळदरींत जाऊन आलों त्यापेक्षां जर पुरंदरकडं गेलों असतों तर फार बरं झालं असतं साहेब!

**कॅप्टन :** आच्छा! आज सफर झाल्यावर आपण काटूजकडे नाहींटर पुरंडरकडे आपला मोर्च्चा वळवूं. काळोजी, टू म्हणशील ट्याप्रमाणें आम्ही वागायला टयार हाय! मनांट डिलगीर होण्याचें काय कारण नाय. टूझ्याषारखा ऊ–माजीछा माहिटगार आमछ्या मडटीला अषयावर आम्ही केन्हांणा केव्हांटरी ट्याला गिरफडार केल्याशिवाय राहणार नाय! आम्ही इंग्रज लोक किटीही निराषा झाली टरी धीर षोडत नाय! आषा, ढीर आणि महट्वाकांक्षा आम्ही कढींबी षोडत नाय! म्हणूनच आम्ही कढींबी अपयेष घेट नाय.

**पुतळ :** खरंच साहेब! तुमची ही चिकाटी पाहिली म्हणजे नवल वाटतं! शिवाय चिकाटीसारखीच तुमची एकीही अवर्णनीय आहे! तुम्ही आमच्या एवढ्या मोठ्या देशाचं राज्य मिळवलंत तें एकी आणि चिकाटीवरच मिळवलंत असं मला वाटतं.

**कॅप्टन :** अगडीं बराबर बोललाष टू काळोजी! या आमछ्या गुणांमुळें किटीही अवघड काम असलें टरी टें आम्ही पार पाडल्याशिवाय राहट नाय!

**पुतळ :** आणि म्हणून म्हणतों कीं, त्या दरवडेखोर उमाजीला तुम्ही लवकरच पकडाल! पण, साहेब, उमाजीला पकडल्यावर मला मात्र आपण विसरूं नका.

**कॅप्टन :** ट्याषमंधीं आम्ही ज्याहरणामा प्रसिद्ध केलाच हाय. प्रथम डहा हजाराचें बक्षिस लाविलें होटें. टें बक्षिष वाढवीट वाढवीट आटां पण्णाष हजारांवर आम्हीं आणून ठेविलें हाय. वेळच पडली टर आम्ही टें एक लाख रुपयांपर्यंट नेल्याषिवाय राहणार नाय! आमछ्याविरुढ खटपट करणाराला णाहिषा करण्याकरिटां आम्ही आमछे राज्य इरेला घालूं! टूं ऊ-माजीला पकडून डिलेंष टर ट्यावेळीं आम्ही ज्याहर केलेली रक्कम टुला मिळेलच.

**पुतळ :** साहेब, उमाजीला पकडून देण्याबद्दल आपण काळजीच करूं नका! उमाजीशीं निकट परिचय माझ्याइतका दुसऱ्या कुणाचाही नाहीं. त्याचे सर्व डावपेंच मला माहीत आहेत. त्याला सांपळ्यांत कसा पकडायचा तो मीच

पकडीन ! साहेब, मी हें तुमच्याकरितां करीत नसून माझ्या अपमानभरपाई-करतां करतों आहें. त्या नीचानं माझा अपमान करून माझीं बोटं चेंचलीं हो !

**कॅप्टन :** हां बराबर ! अण् त्याच टूझ्या बोटें टेंचण्याचा उपयोग आम्ही करण्याचें ठरवलें हाय. टूला षांपडण्याकरतां आम्हांस लय ट्रबल झाले.

**पुतळ :** मी दिलगीर आहें, साहेब !

**कॅप्टन :** काळूजी, ऊ-माजी आमचा खजिना लुटून आम्हांला ट्रास डेटो म्हणून ट्याला गिरफडार करून ठार करणें आम्हांला भाग हाय ! पण ट्याणें हें पापी कृत्य जर ण केलें असटें, टर आमछ्या षरकारनें ट्याला जनरलची जागा डिली असटी. पण ऊ-माजी आमछा खजीना लुटून आम्हांला ट्रास डेटो, म्हणून ट्याला ठार खरणें आम्हांला भाग हाय !

**पुतळ :** पण साहेब, आजचा खजिना कांहीं उमाजीच्या हातीं लागायचा नाहीं. आपण योजलेल्या युक्तीनं उमाजी आज सपशेल फसणार !

**कॅप्टन :** डोली षुखरूप आली कीं आपण विजय झालों. ( मागील पडदा वर जातो. कॅप्टनचा शामियाना. आंत मेज, खुर्ची व चित्राचा फळा आहे. )

**कॅप्टन :** ( मेजावरील पत्रें वाचून ) काळूजी, ऊ-माजीछें हें चिट्र आजछ्या आज पूरें करून ऊद्यांछ्या विलायटेछ्या बोटीनें गेलेंच पाहिजे ! आमच्या वरिष्ठांचा तसा हूकुम हाय. छला. आजच्या आज तें चिट्र पूरें करून बॉम्बेला पाठवून डेवूं. छला, आढीं टें चिट्र पूरें करूं.

**तात्याबा :** ( चपराशाच्या वेषांत येतो व लष्करी पद्धतीनें सलाम करतो. ) साहेब, भोंडे दऱ्यांतून खजिना आला हाय !

**कॅप्टन** ( उत्सुकतेनें ) आच्छा, आना डो. ( मावळी वेषांत असलेले कांहीं मोलकरी डोली घेऊन प्रवेश करतात. तात्याबाच्या खुणेप्रमाणें डोली ठेवून मोलकरी व तात्याबा सलाम करून निघून जातात. ) खजिना टर षाबूद आला ! आमछ्या जबाबदारीची आम्हांला मोठी काळजी होटी. काळूजी, आज काट्रजकडे ज्याटांना आपण हा खजिना पूण्याच्या खजिन्यांट नेऊन गुडरूं.

**पुतळ :** आच्छा साहेब !

**कॅप्टन :** चला, आटां टें चिट्र पूरें करूं. सीपाय—(टेबलावरील बेल वाजवितो. तात्याबा प्रवेश करतो.) रंग—षामान लाव. (तात्याबा रंगाचें सामान घेऊन येतो व परत जातो.) काळूजी, टू याडी करून डिल्याप्रमाणें मीं हें छिट्र पूरें केलें हाय. पाहून षांग पाहूं, ट्यांत काय छुकलें टें! (कॅप्टन फळ्यावरील आच्छादन दूर करतो.)

**पुतळ :** साहेब, हें चित्र कांहीं जमलें नाहीं. असा नाहीं उमाजी, साहेब! साहेब, पुन्हां काढा तें चित्र.

**कॅप्टन :** ह्यांट खाय छुकलें ?

**पुतळ :** काय चुकलं काय साहेब! अहो, सर्वच चुकलं! तुम्ही ही त्याची ब्राह्मणी पगडी काढलीत, पगडी काढायची शिलेदारी!

**कॅप्टन :** (हातांत पेन्सील व वही घेऊन) आच्छा, पगरी बामणी नाय, शिलेडारी पाहिजे. (लिहून घेऊन) थँक्स्. और क्या ?

**पुतळ :** आन हें नाक नकटं झालं साहेब!

**कॅप्टन :** आच्छा, नाक नकठे नाय. शरळ पाहिजे. (प्रत्येक वेळीं लिहून घेतो.) अच्छा, और क्या ?

**पुतळ :** आणि हा आंगरखा कसला काढलांत ? अहो, तो तुमच्यासारखा अंगरखा नाहीं वापरीत, साहेब!

**कॅप्टन :** खाळोजी, मला अंगरख्याछा अर्थ कळला नाय, म्हणून मी चपराश्शाला विचारलें. त्यानें कोट म्हणून षांगितलें. कोट अषाच नषटो का काळोजी ? आच्छा. कोट नाय, झगा पाइजे.

**पुतळ :** साहेब, झगा नाहीं, अंगरखा. मी घातला आहे असा.

**कॅप्टन :** आच्छा, और क्या ?

**पुतळ :** आन् तो पायांत बूट कशाला घातलांत ? तो बूट नाहीं वापरत !

**कॅप्टन :** बूट नाय ? वंडर! आच्छा. बूट नाय, जोडा पाइजे.

**पुतळ :** जोडा नाहीं, वहाणा पाहिजेत.

**कॅप्टन :** आच्छा, वहाणा पाहिजेत. (त्रासून) काळोजी, टसें नको! मी पुना टें चिट्र काढतों. टूं पाहून षांग पाहूं, ट्यांट काय छुकटें टें ?

**पुतळ :** साहेब, तसं नको ! तुम्ही किती जरी मन लावून चित्र काढलं तरी तें नीट जमायचं नाहीं. मीं उमाजीला प्रत्यक्ष पाहिला असल्याकारणानं मीच बरोबर काढीन तें चित्र !

**कॅप्टन :** खाळोजी, मी पुढां ऊ-माजीला परठ्यक्ष पाहिला हाय; पन ठ्या वेळीं ट्यानें वेषांतर केलें होटें अषें टूं म्हणालाष, म्हणूनश्यान हा चिट्र बराबर निघाला नाय. आच्छा, टूं काढ-टूं काढ. ( पुतळ चित्र काढूं लागते. बाहेरील बाजूस काळोजीची व तात्याबाची बाचाबाच होऊन मोठी आरडा-ओरड होते, ती ऐकून ) व्हॉट्स् द् मॅटर ? सिपॉय-

**तात्याबा :** ( सलाम करीत प्रवेश करून ) जी साब-

**कॅप्टन :** ( रागावून ) क्या गडबड हाय ?

**तात्याबा :** बाहेर योक मनुक्ष आला असून आपली हिजीट मागतो हाय साहेब !

**कॅप्टन :** नो टाइम !

**तात्याबा :** नो टाइम म्हणून सांगितलं, साहेब; पन तो ऐकतच नाय, साहेब. डोकं आपटून जीव दिइन म्हंतो, साहेब. कुनी तरी त्यो पागल मनुक्ष आहे, साहेब. निकाम्या घोड्यावानी शूट करून त्याला मारायला पाहिजे, साहेब. ऑर्डर व्हइल तर-सोजराकडनं त्याला मारून टाकतों साहेब.

**कॅप्टन :** ( विचार करून ) नो नो. ब्रिंग हिम् इन्. आंट घेऊन ये ठ्या आडमीला.

**तात्याबा :** ( सलाम करून ) आच्छा, साहेब. ( स्वगत ) भरलीच आमची शंभर वर्स ! आतां भिमाला घेऊन पोबारा केलाच पाहिजे. ( सलाम करून एकदम निघून जातो. )

**कॅप्टन :** ( पुतळ गांगरून उभी आहे असें पाहून ) काळोजी, गो ऑन, गो ऑन. चालूं डे टूझें रंगकाम. ( काळोजी प्रवेश करतो. )

**पुतळ :** ( स्वगत ) कोण, काळूजी ?

**काळोजी :** ( आलेल्या बाजूकडे पाहून ) कसला हलकट मनुष्य रखवालदार नेमला आहेत साहेब ? पन्नास हेलपाटे घातले तरी दाद लागूं देईना. पाजी गाढव नाहीं तर-

**पुतळ :** हो, काळोजीच हा. आतां मात्र कठीण प्रसंग आला !

**काळोजी :** ( पुतळला ओळखून ) ( स्वगत ) कोण पुतळ ? अन् बाप्याच्या वेषांत ? असं काय ? ठीक आहे. आतां ह्या काळोजीशीं गांठ आहे !

**कॅप्टन :** ( चिडून ) हू आर यू ? व्हाट डू यू वॉंट ? ( काळोजीस कांहीं समजत नाहीं. )

**काळोजी :** राम राम साहेब. सलाम.

**कॅप्टन :** षलाम. टूला काय पाजे ?

**काळोजी :** साहेब, उमाजीला पकडण्यापायीं जाहीरनाम्याच्या कागदानं दरोबस्त गांवांच्या भिंती भरून काढतां, अन् कुणी उमाजीला पकडून देणारा आलाच, तर दारावरच्या चावऱ्या कुत्र्याकडून त्याला बाहेर पिटाळतां, हें तुमच्या सरकारपणाला आन् झकपक पोषाखाला शोभत नाहीं साहेब !

**कॅप्टन :** क्या हूवा ?

**काळोजी :** क्या हूवा क्या साहेब ?

**कॅप्टन :** ( रागावून ) शट् अप् !

**काळोजी :** रागावूं नका, साहेब. माफ करा. मी आहें खेडवळ मनुष्य. आपल्याशीं कसं बोलायचं तें मला समजत नाहीं. मला माफ करा, साहेब. ( पुन्हां मुजरा करतो. )

**कॅप्टन :** टू कोण ?

**काळोजी :** उमाजी नायकाच्या टोळींतला मी एक मुख्य सरदार होतों. साहेब, काळोजी माझं नांव. माझी आन् त्याची बोलाचाली होऊन त्यानं मला शिक्षा केल्यामुळं मी अगदीं त्याच्यावर चिडून गेलों आहे. आपल्या जाहीरनाम्याप्रमाणं मी त्याला जिवंत आपल्या स्वाधीन करायला तयार आहें. जर त्याला पकडून दिलं तरच होय म्हणा; नाहींतर मला गोळी घालून ठार मारून टाका साहेब.

**कॅप्टन :** ( पुतळला ) खाळोजी, हा कोण डुसरा खाळोजी ?

**काळोजी :** आं ! म्हंजे ?

**कॅप्टन :** खाळोजी, टूं ह्या खाळोजीला ओळखतोस ?

**पुतळ :** छेः ! हा मनुष्य माझ्या ओळखीचा नाहीं. कुणीतरी भामटा आपल्याला फसवायला आला आहे. साहेब, लाथ मारून हाकलून द्या या चोराला !

**काळोजी :** छान ! मी खरा काळोजी चोर, अन् माझं सोंग घेणारी ही डांबरट बया साव. खासा न्याय ! धन्याचं नांव गण्या अन् चाकराचं नांव रुद्राजीबुवा. पण माझ्याशीं गांठ आहे म्हणावं ?

**कॅप्टन :** ( पुतळला ) खाळोजी हा काय प्रकार हाय ?

**काळोजी :** सरकार, कसला प्रकार घेऊन बसलांत ! तुम्हांला या माणसानं सपशेल फसवलं. खरा काळूजी मी असून तुम्ही ह्याला काळोजी समजतां साहेब. तुमच्या सरकारपणाला शोभत नाहीं साहेब !

**कॅप्टन :** माय लॉर्ड ! व्हाट ए वंडरफुल कन्फ्यूजन यू हॅव सेट बिफोर मी ! आय ॲम् थरली वंडरस्ट्रक !

**काळोजी :** साहेब, विंग्रजींत शिव्या देऊन काय उपयोग ? तुम्ही सपशेल फसलांत साहेब.

**कॅप्टन :** क्या !

**काळोजी :** आतांतरी सुधारा. अन् या तोतया काळोजीला हांकलून द्या, नाहीं तर तुमच्या लष्कराच्या भाकरी भाजायला ठेवा. हा काय तुम्हांला उमाजी पकडून देतो, साहेब !

**पुतळ :** चूप बैस. हलकट इसम नाहींतर ! साहेबाच्या समोर माझी बदनामी करतोस ?

**कॅप्टन :** ( रागावून ) सबूर. टूम्ही डोघबी सबूर करा. तुम्हां डोघांवरबी माझा विश्वास नाय. तुमच्यांपैकीं कुणीटरी एक लबाड मनुष्य अषला पायजे.

**पुतळ :** साहेब, हा लबाड आहे.

**काळोजी :** साहेब, हा लबाड आहे.

**कॅप्टन :** ( आणखी एक दोन वेळां ऐकून घेऊन ) शट् अप् ! टुम्ही डोघेबी लबाड आहा. ठांबा. तुम्हांला एकदम गिरफडार खरुन आमच्छया लष्करी कोर्टापुढें हजर करटों; अण् रायफळणें ठार करटों; यू टू वुइकेड डॉग्ज्, रोग्ज्.

**काळोजी :** साहेब मला मारा, पण न्याय करून मारा. उगीच कुत्र्यासनी मारतात तसं मारूं नका बगा.

**कॅप्टन :** ( विचार करून ) आच्छा. बोल ठर.

**काळोजी :** मी खरा काळूजी असून हा सोंगाड्या काळूजी आहे, हें मी तुम्हांला आतांच्या आतां इथं दाखवायला तयार आहें ; पण तसं दाखवल्यावर माझी आपल्याला एकच अट आहे कीं, उमाजीला पकडण्याचं सारं कारस्थान तुमच्या अन् माझ्याशिवाय कुणालाही कळतां कामा नये. शिवाय तुमच्या खास राहुटींतला कोणी नोकर चाकर ठेवायचा असेल तर तुम्हीं मला विचार-ल्याशिवाय ठेवतां कामा नये. काय सांगू, साहेब, सगळे उमाजीचे लोक सभोंवतीं जमवलेत अन् बसलात त्याच्याविरुद्ध जाळं विणीत! अशानं तो तुम्हांला सांपडतो व्हय ? तो तुमचा चपराशी, तो दारावरचा हलकट कुत्रा, उमाजीचा हस्तक आहे. आणि म्हणूनच त्यानं ह्या चोराला आंत घेतलं आन् मला दहा वीस वेळां धुडकावून लावलं. खोटं वाटत असंल तर आहे का बघा तो पहाऱ्यावर. ( कॅप्टन "शिपॉय शिपॉय" म्हणून हांक मारतो. पण तात्याबा येत नाहीं असं पाहून ) कसच्या हांका मारतां, तो ढुंगणाला पाय लावून पळून गेला साहेब !

**कॅप्टन :** आच्छा ! दाखेव टूला काय डाखवायछें टें.

**काळोजी :** आच्छा, साहेब ! ( पुतळला ) काय, काळोजीराव, मुकाट्यानं आपलं सोंग उघडं करतां कां पाह्यचा आहे या काळोजीचा मासला ?

**पुतळ :** चल हाट बाजूला ! मूर्ख, पाजी नाहींतर !

**काळोजी :** पुतळ, तुला इतक्या इलम्या माहीत असतील ह्याची मला कल्पना नव्हती. माझं सोंग घेऊन इथं राहिलीस, चांगलीच अक्कल आहे कीं तुला ! पण आतां बऱ्या बोलानं आपलं सोंग उघड कर, नाहींतर स्वतःच्या हातानं तूं आपली बेइज्जत करून घेशील.

**पुतळ :** किती लफंगा पाजी मनुष्य आहेस रे तूं ? माझ्यासारख्या प्रतिष्ठित माणसावर वाटेल ते आरोप करायला तुला शरम नाहीं वाटत ? गाढव नाहींतर !

**काळोजी :** अरे वाः ! इतकी बेअब्रू होण्याची अन् प्राणावर बेतण्याची वेळ आली, तरी तूं अजून नागमोडी वळणानं लपंडाव चालवला आहेस काय !

ठीक आहे तर मग ! एका क्षणांत मी तुला सरळ करतों. ( काळूजी पुतळच्या अंगावर धांवून जातो व तिच्या डोक्याचा फेटा काढतों. पुतळ काळोजीवर खंजीर उपसते. इतक्यांत कॅप्टन तिचा हात धरतो. पुतळ गांगरून जाते. )

**कॅप्टन :** ओ माय गॉड ! ए ब्युटिफुल वूमन् इन् डिस्‌गाइज ऑफ ए मॅन्! ये टो खुपषूरट औरट हाय !

**काळोजी :** आहे ना ? पाहून घ्या. हा काळोजी नाहीं हें प्रत्यक्ष पहा. आणि ह्या बोटाकडे लक्ष्य देऊन मीच खरा काळूजी आहे याची साक्ष पटवून घ्या. साहेब, उमाजीनं माझीं बोटं ठेंचलीं होतीं, तीं अद्याप बरीं झालीं नाहींतच, पण त्याच्या वेदनाही कमी झाल्या नाहींत. माझ्या या वेदना कमी होण्याच्या आंत...उमाजीला मी जर पकडून न देईन तर ह्या साल्याचे बाप दोन !

**कॅप्टन :** शाबास, शाबास ! काळोजी, टूंच खरा काळोजी आहेष. टूझ्या ह्या हुशारीबद्दल आमचा ए. डी. सी. करण्याबद्दल आम्ही वर शिफारस करूं. टूंच ऊ-माजीला पकडून देशील असा आमछा पूरेपूर विष्वाष पटला हाय. आटां टू षांगषील ट्याप्रमाणें ह्या बाईछी आम्ही व्यवस्ठा करूं. ही बाय तुझ्या ओळखीची हाय ?

**काळोजी :** काय, ओळखीची ? अहो साहेब, ओळखीचीच काय, ही त्या लुटारू उमाजीची बायको आहे.

**कॅप्टन :** ( आश्चर्यानें ) काय ! ही षुंडर स्ट्री ट्या ऊ-माजीछी बायको ?

**काळोजी :** होय.

**कॅप्टन :** आछर्य हाय. हिंडी बायका इतक्या धीट अषटाट हें आम्ही आज प्रत्यक्ष पहाटों हाय. हीच्याप्रमाणें जर बाकीछया बायका धीट होटील, टर हिंडुस्ठाण आम्हांला हिंडी लोखांछया स्वाधीण खरण्याची वेळ लवकरच येईल. ह्या बाईछें कौटुक खरावें टेवढें थोडेंच हाय. सरटनूली शी इज् अ ब्रेव्ह अँड करेजस् वूमन् !

**काळोजी :** सरकार, तुम्ही तिच्यावर भाळून जाऊं नका. असल्या भयंकर स्त्रीला जिथल्या तिथं ठार केली पाहिजे.

**कॅप्टन :** छेः ! छेः ! खाळोजी, ह्या कृट्याबडल हीचें अभिनंदन खरायला पाजे.

**काळोजी :** ( स्वगत ) अभिनंदन कसलं बोडक्याचं करतां !

**कॅप्टन :** खाळोजी, मी जरी लष्करी इषम अषलों, डया आणि माया या गोष्टींना पारखा अषलों, टरी एका अषहाय स्ट्रीवर हत्यार छालवणें माझ्याषारख्या वीर पुरुषाला कढींबी शोभनार नाय! ( काळोजी आपल्याशीं चरफडतो. )

**पुतळ :** ऐक, ऐक, मेल्या काळ्या, ऐक हे या वीरपुरुषाचे...तुझ्या काकाचे उद्‌गार ऐक; आन्‌ तुझं तें काळं थोबाड मातींत खुपस!

**काळोजी :** चूप बैस! माझं थोबाड मातींत खुपसण्याऐवजीं, तुझं थोबाड फोडून तें मातींत मिसळल्याशिवाय मी राहात नाहीं, ध्यानांत ठेव! त्या दिवशीं तूं माझ्या हातून सुटलीस, पण आतां कुठं जाशील? आतां तूं या काळोजीच्या हातांत पुरेपूर सांपडली आहेस. साहेब, तुम्हांला या पोरीचा कितीहि कळवळा येवो, माझी जर तुम्हांला उमाजीबाबत मदत पाहिजे असेल तर तुम्ही आतांच्या आतां या पोरीला ठार केली पाहिजे! लष्करच्या मदतीवर उमाजी आपल्याला सांपडणार नाहीं हें आतांपर्यंतच्या अनुभवावरून आपल्याला माहीत झालंच असेल. विचार करा, उमाजीसारख्या वाघाला पकडायचाच तर तो उघड उघड पकडतां येणं अशक्य आहे; त्याच्याकरतां सांपळाच तयार करायला पाहिजे. आणि तो कसा करायचा तें ह्या काळोजीला पुरेपूर माहीत आहे. त्या सांपळ्याची रचना तुम्हांला जर समजून घ्यायची असेल तर एका क्षणाचाही विचार न करतां ह्या पोरीला एकदम ठार करा!

**पुतळ :** काळ्या, हलकटा, नीचा, तुझं हृदय माणसाचं आहे का पिशाच्चाचं आहे रे? हा थोर उदार पुरुष मला दया दाखवीत असतां, मला मारण्याचा तूं त्याला उपदेश करतोस काय? पण लक्षांत ठेव, मी जरी इथं असहाय सांपडून मारली गेलें तरी तूं जिवंत सुटशील असं समजूं नकोस! आपली स्त्री मारली गेली हें पाहून माझे पती – तो नरसिंह आपल्या गडगडाटानं आकाशपाताळ एक करील आणि पाळत ठेवून तुझ्या चिंधड्या उडविल्याशिवाय राहणार नाहीं.

**काळोजी :** त्याच सिंहाला जाळ्यांत पकडण्याच्या विचारांत आहें. तो सांपडेल तेव्हां सांपडेल, आज त्याची ही सिंहीण माझ्या हातांत सांपडली आहे इतकंच मला बस्स आहे! या सिंहीणीला आज आधीं नाहींशी करतों, म्हणजे लोकांना उत्पन्न करणाऱ्या पुढील पैदाशीला तरी आळा बसेल.

सरकार, मी आतां सांगितलेल्या गोष्टींचा नीट विचार करा! ह्या पोरीला तुम्ही जिवंत ठेवलीत कीं हा काळोजी तुम्हांला अंतरलाच म्हणून समजा! या काळोजीला नाराज करून तो एकदां निघून गेला म्हणजे शेंकडों शिपाई रात्रंदिवस जरी उमाजीला पकडण्याकरतां दरीखोरीं धुंडित राहिले, तरी त्याचा कांहींएक उपयोग होणार नाहीं! उमाजी तुमच्या हातून कायमचा गेला! लाखों रुपये आणि शेंकडों शिपाई खर्ची घातलेत तरी कांहींएक उपयोग होणार नाहीं! या काळोजीच्या मदतीनं उमाजी आज तुम्हांला स्वस्तांत पडतो आहे; पण पुढं फारच महागांत पडेल; याचा नीट विचार करा, अन् मग ह्या कार्टीला जिवंत सोडा!

**कॅप्टन :** (स्वगत) सरट्नूली इट्स हार्ड नट् टु क्रॅक! या स्ट्रीला मारूं नये अषें वाठथें, पन खाळोजीनें घाटलेल्या अटीमुळें आमछा नाइलाझ झाला हाय. आझवर ऊ–माजीला पकडण्याची आम्ही शिखस्ठ खेली, पण टो हाठीं लागट नाय. आण् आझ हा खाळोजी गमावला, टर टो षांपडणें मुष्कील होवून वरिष्ठांछा बोल येईल. फॉर दि शेक ऑफ कंपनी इट्स माय ड्यूटी टु कट् हर ऑफ! खाळोजीनें नडवलें काय? आच्छा. ह्या बाईछया प्राणांछया मोबडल्यांत खाळोजी टूलाही आपले प्राण डेवे लागटील. (पुतळकडे वळून) भगिणी, खेवळ खर्तव्याकडे लक्ष डेवूण टूला मारणें मला भाग पडट हाय. मे गॉड ब्लेस यू इन हेवन्!

**पुतळ :** साहेब, किती उदार अंतःकरण तुमचं! तुमच्या कांहीं लोकांत असे कांहीं चांगले गुण आहेत, म्हणूनच तुम्ही आमच्या एवढ्या मोठ्या देशाचें राज्य करतां आहांत. आणि ते गुण असेपर्यंत आमचा देश तुमच्या पूर्ण ताब्यांत राहील. पण ज्या दिवशीं तुम्ही माणुसकीला सोडून वागूं लागाल त्यावेळीं तुम्हांला इथं एक क्षणभरही राहतां येणं अशक्य होईल. या पुतळला परमेश्वरानं भाऊ दिला नाहीं, तुम्हीच माझे धर्माचे भाऊ आहांत. या माझ्या धर्माच्या भावाला नमस्कार करून, माझ्या पतिदेवाला नमस्कार करून त्यांच्याच आज्ञेनं मी मरायला तयार आहें!

**कॅप्टन :** ठीक हाय. खाळोजी, खेवळ टूझ्या शब्डाकरटां ह्या स्ट्रीला मारण्याचें क्रूर कृट्य आम्ही 'करटों हाव. पण गूणी माणसांछा नाष

आमछ्याछ्यानें पाहवणार नाय, म्हणून आम्ही आट जाटों, शिटी वाजविटों; लगेच माझे लोक ढावूण येटील, आण ह्या बाईला नाहींशी करटील.

**काळोजी :** हिला ठार केली कीं लगेच उमाजीवरच आपली मोहीम!

[ "ठीक हाय" असें म्हणून कॅप्टन आंत जातो व शिटी वाजवितो. डोलींतून "जय येळकोट मल्हार" असा जयघोष करून उमाजी बाहेर येतो व "तो हरामखोर काळूजी कुठं आहे" असें म्हणून त्याच्यावर धांवून जातो. काळूजी पळून जातो. दोन्हीकडून अनेक शिपाई तलवारी घेऊन प्रवेश करतात. उमाजीशीं शिपायांची चकमक सुरू होतांच लाठी घेऊन "जय येळकोट मल्हार" करीत गंगारामही प्रवेश करतो व लढूं लागतो. गंगारामाची मदत मिळतांच उमाजी पुतळला उचलून घेऊन पसार होतो. गंगाराम सगळ्या शिपायांशीं निकरानें लढत असतां पडदा पडतो. ]

## अंक दुसरा समाप्त

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

[ **स्थळ :** पुतळच्या वाड्यांतील दिवाणखाना. जाजमाच्या मध्यभागीं पट मांडला आहे. काळोजी, कॅप्टन मॅकिन्टॉष व अनेक सैनिक आंत घुसतात. पलंगाच्या खालीं, वर व दिवाण-खान्याच्या दोन्ही बाजूंस पाहून आंत जाऊन शोधाशोध करतात. उमाजी सांपडत नाहीं असें पाहून दोन्हीकडून सर्व सैनिक बाहेर येतात व " नो नो " असें म्हणतात. ]

**काळोजी :** साहेब, मी तुम्हांला आधीं सांगितलं नाहीं का, कीं उमाजी इथं सांपडणार नाहीं म्हणून ! अहो तो इथं कसचा राहतो ? तो झाला डोंगरांत केव्हांच फरारी !

**कॅप्टन :** अबि ओ किदर मिलेगा ?

**काळोजी :** हां, असं विचारा. हें पहा, साहेब, आतां तसं नको. उमाजीला पकडण्याचा सांपळा दाखविण्याचं मीं तुम्हांला कबूल केलं आहे ना ?

**कॅप्टन :** हां, बराबर. वहि सांपळाच तूं मला बतलाव.

**काळोजी :** आच्छा, चला तर माझ्या मागोमाग.

**कॅप्टन :** (सैनिकांस) आच्छा, चलो. (सर्व निघून जातात. इतक्यांत भुयारांतून उमाजी व पुतळ वर प्रवेश करतात.)

**उमाजी :** सोड, सोड मला, त्या हरामखोर काळ्याच्या नरडीचा मला आधीं घोट घेऊं दे ! साहेबाच्या छावणींतच खरं पाहिलं तर त्याची माझ्याकडून मुंडी उतरली जायची ; पण तुला वांचवण्याच्या भरांत मला त्याचा पाठलाग करतां आला नाहीं. सोड, पुतळ, सोड मला !

**पुतळ :** नाहीं – मी आपल्याला सोडायची नाहीं ! धनी, आपल्या पराक्रमाबद्दल आपल्या शत्रूंलासुद्धां शंका यायची नाहीं ; पण काळवेळाकडं थोडं तरी लक्ष नको का पुरवायला ? ह्यावेळीं आपण काळोजीवर चालून गेलांत, तर इतक्या

लोकांपुढं आपला एकट्याचा कसा निभाव लागेल? धनी, कांहीं करा पण ह्या वेळीं तुम्हीं आपला काळूजीबद्दलचा संताप आवरून धरा! या पुतळच्या गळ्याची आपल्याला आण आहे.

**उमाजी :** पुतळ, भलत्याच वेळीं कसली आण घालतेस तूं! त्या दिवशीं जिजीच्या हट्टामुळं काळोजीला मला सोडावं लागलं आणि आज तुझ्या...

**पुतळ :** कांहीं असलं तरी आत्तां आपण स्वस्थ बसलंच पाहिजे! आन् हो, खरंच — जिजाबाईच्या हट्टामुळं काळोजी सुटून आतां तो आपल्या प्राणांवर बेतला आहे, हें आपण जिजाबाईना नुसत्या शब्दानंसुद्धां विचारलं नाहीं बरं का? आपला त्यांच्याबद्दलचा ग्रह वाईट करण्याकरतां म्हणून नव्हे, निदान काळूजीबद्दल त्यांना योग्य ती जाणीव व्हावी म्हणून आपण एकदां त्यांना हें सर्व सांगावं असं म्हणतें मी.

**उमाजी :** पुतळ, त्यावेळीं झालं तें झालं. आतां त्याची जाणीव करून देण्यांत काय अर्थ आहे? आमचा खेळगडी म्हणून मी जिजाच्या शब्दांकरतां काळोजीला जिवंत सोडला. असं पुढं होईल हें तिला तरी काय माहीत जिजाला, तूं म्हणतेस तशी जाणीव मी प्राणांतींही देणार नाहीं! माझ्या जिजाचा शब्द मानण्याचा तो प्रसंग — त्याचं महत्त्व मी कशाला कमी करूं? तसं विचारल्यानं माझ्या जिजाला काय वाटेल?

**पुतळ :** बरं, राहिलं माझं बोलणं. आपल्या ह्या नाजुक भावनेची मला आधींच जाणीव असती, तर मी चुकूनही आपल्याला सांगितलं नसतं. बरं, आतां खेळायचं ना? डाव पुरा झाला पाहिजे.

**उमाजी :** राहूं दे आतां. त्यांतलं जर मला कांहीं कळत नाहीं, तर मग हे असले चैनीचे खेळ पाहिजेत कशाला? माझा हा खेळ नाहीं, पुतळ. जीव रमत नाहीं त्यांत. पुरें आतां.

**पुतळ :** तें कांहीं नाहीं. डाव पुरा झाला पाहिजे. आपली सोंगटी मारण्याची वेळ आजच आली आहे. आतां नाहीं मी तशी सोडायची!

**उमाजी :** हें पहा, माझी सोंगटी तूं मारलीस तर त्यांत इतकं नवल काय आहे? बोलूनचालून हे डाव खेळण्यांत मी नवखा! पुतळ, तुझ्या सोंगटीच्या तावडींतून माझ्या सोंगटीचा बचाव कसा करावा हें जरी मला

कळत नसलं, तरी साहेबापासून माझ्या सवंगड्यांचा बचाव कसा करावा, आन् दऱ्याखोऱ्यांत कसं पसार व्हावं हें मी हमखास जाणूं शकतों. कारण तो खेळ मीं बालपणापासून शिकलों आहें. तरीपण याही डावांत मी अगदींच हार जाईन असं समजूं नकोस !

**पुतळ :** हें पहा, उगीच तोंडच्या बाता नकोत ! साहेबाच्यानं तुम्हांला जिंकतां आलं नाहीं म्हणून माझ्यापुढं आपलं नाहीं हं कांहीं चालायचं ! आदिमाया पार्वतीच्या पुढं भोळ्या सांबसदाशिवानं असाच चंग बांधला होता, पण शेवटीं शंकर हरले बरं का !

**उमाजी :** ( स्वगत ) माझ्या जीविताच्या खेळांत मीसुद्धां हरणार का ? काळोजीसारख्या माझ्या लोकांच्या या विपरीत वागणुकी पाहिल्या म्हणजे माझ्या पोलादी इच्छेच्या सांखळीची कडीन् कडी तुटून पडते. या उमाजीला कुणीच जाणत नाहीं ; आणि त्याच्याशीं कोणी समरसही होत नाहीं. पण माझी ही हुरहुर इतक्यांतच नको हिला समजायला.

**पुतळ :** कसला विचार चालला आहे भोळ्या सांबाचा ?

**उमाजी :** चल, चल ! उगीच टकळी लावूं नकोस. पार्वती आईनं शंकराला जिंकलं ; म्हणून साऱ्या बायकांना पटाच्या खेळांत विजय मिळविण्याचा परवाना मिळाला आहे होय ? तूं ऐकतच नाहींस तर होऊनच जाऊं दे. चल, मुकाट्यानं दान टाक ! ( पुतळ दान टाकते ; उमाजी ‘ जय येळकोट मल्हार ” म्हणून ओरडतो. ) दहा, – दहा, –

**पुतळ :** ठीक आहे. आतां नक्कीच. ( पुन्हां दान टाकते ) च च च – तीन.

**उमाजी :** शाबास रे माझ्या देवा ! आतां गेली बघ सोंगटी पार उमाजीवानी डोंगरांत ! ( दान टाकतो ) अर्रर्र. दोन. छेः ! गेला मोका.

**पुतळ :** आतां तो मोका मी साधतें बरोबर.

**उमाजी :** छट् ! नांव घेऊं नकोस.

**पुतळ :** इतका डाव कधींच रंगला नव्हता. आजच स्वारी खरी रंगली आहे !

**उमाजी :** लइ चघळपणा करूं नगस. आधीं दान टाक. नाहींतर पलंगाचा गलथा अन थोबाड एका हातासरशीं एक करून टाकीन बघ !

**पुतळ :** तो गलथा नको गडे ! मी आपलं मस्तक या छातीवर ठेवतें, आन् मग हें मस्तक आणि ही छाती एका......नाहींतर दोन्ही हातांनीं आपण एक करून टाका.

**उमाजी :** हं, तुला दुसरं काय सुचतंय् ? हें बघ, आधीं खेळाचा शेवट लाव. चल दान टाक.

**पुतळ :** ठीक आहे. (दान टाकते.) दोन. ही पहा मेली तुमची सोंगटी. (सोंगटी मारते. जिजा प्रवेश करते. तिच्या अंगावर तिनें आपादमस्तक भुती वेष्टिलेली असते.)

**उमाजी :** कोण, जिजा ? अन् माय केव्हां आलीस ? अगदीं अचानक आलीस ग ? (पुतळ जिजाच्या अंगावरील भुती काढून एकीकडे ठेवून देते.)

**जिजा :** हो, आलें खरी अचानक. काय सांगूं दादा तुला ? या धागधुगीच्या काळांत जिवाला चैनच पडत नाहीं बघ. आतांशी कीं नाहीं सोजरांचा फारच ताण झाला आहे. तुझ्यावर केव्हां संकट येईल याचा कांहींच नेम नाहीं. दादा, जरा जपून वागत जा, हें सांगण्याकरतां मुद्दाम इथं आलें. असा हा तुझ्यामागं काच असतांना माझ्याच्यानं कसं स्वस्थ बसवेल ?

**उमाजी :** नाहीं बसवणार ! पण बये, एवढ्याकरतांच आलीस ? बरोबर कोण आलंय् ?

**जिजा :** कुणी नाहीं. कुणी रामोशी बरोबर घेणार होत्यें, पण म्हटलं, कशाला ? घोडं सजवलं आणि आलें.

**उमाजी :** जिजा, इतकी काळजी करण्याचं काय कारण ? माझ्या मल्हारी मार्तंडाच्या कृपेनें मी कळीकाळालाही हार जाणार नाहीं. शिवाय हा वाडा किल्ल्यासारखा मजबूत असून त्यांतील तळघरांचा कुणालाही पत्ता लागत नाहीं. खालच्या तळघरांच्या वाटा पार डोंगरांत पसार होतात. शिवाय मी पंचहत्यारी सज्ज होऊन एकदां मैदानांत उतरलों, म्हणजे कुणाही सोजराची माझ्यापुढं उभं राहण्याची छाती होत नाहीं हें तुला माहीत आहेच. पांच-पन्नासांना हा उमाजी अगदी हांसत हांसत कापून टाकतो अन् शेंपांचश्यांच्या फळीचा सहज धुव्वा उडवून देतो, हें तूं पाहिलं नाहींस का ? जिजा, हा तुझा उमाजी समोरासमोर कुणालाही हार जाणार नाहीं. मागून एखाद्या गोळीनं घात नाहीं केला, तर हा तुझा दादा साहेबाला अजिंक्य आहे, समजलीस !

**जिजा :** दादा, तुझा पराक्रम मला माहीत का नाहीं! पण वेळवखत कुणाला सांगून येत असतो का? आपलं जपून रहा, एवढंच माझं म्हणणं. राहवेना म्हणून सांगायला आलें बघ.

**उमाजी :** अन् मी म्हणतों, बरं झालं आलीस. (दोघे पलंगावर बसतात. पुतळ उभी राहते.) तुझा माझा एकत्र थाळा होऊन आज कितीतरी दिवस झाले. लग्नानंतर तूं गेलीस ती आज मला भेटते आहेस. तुला भेटून फार दिवस झाले म्हणजे मलाहि चैन पडत नाहीं बघ!

**पुतळ :** बरं झालं आलांत. एके ठिकाणीं चार दिवस राहणं होऊन पोटभर बोलायला सांपडेल. अशा या कठ्ठ काळांत जिवाचीं माणसं एके ठिकाणीं असलीं म्हणजे तितकंच बरं वाटतं मनाला! त्यांतून इकडं तर आपली आठवण दिवसांतून दहा वेळां होते.

**जिजा :** दादा, किती चांगली बायको मिळाली आहे तुला! सोन्यासारखी आहे; अगदीं रत्न आहे हं!

**उमाजी :** व्हय, रतन हाय रतन. मायंदळ सोनं आन् रतनं घेऊनशान् बया पदरांत पडलीया.

**पुतळ :** हं, झाली सुरवात.

**जिजा :** (स्वगत) विषय काढायला वेळ बरी आली. (उघड) दादा, या लक्ष्मीबरोबर अगणित लक्ष्मी तुला मिळाली असं मी ऐकतें तें खरं का रे?

**उमाजी :** व्हय व्हय. मायंद्याळ लक्ष्मी मिळालीया.

**जिजा :** मला नाहीं हं तूं कांहीं दाखविलंस! नेहमीं कांहीं ना कांहीं आपल्या जिजीला देण्याचा शिरस्ता तूं अगदींच विसरलास, दादा!

**उमाजी :** आजवर मी तुला कधीं विसरलों नाहीं, मग आजच कसा विसरेन? ह्या उमाजीला हाच काय तो एक मायेचा धागा आहे. आणि आजवर ह्या कोमल धाग्याची मी मनोभावानें जोपासना करीत आलों आहें.

**जिजा :** हो, आला आहेस. पण ह्या बयेला माळ घातल्यापासून तूं मला कांहींच विचारलं नाहींस! निदान काय काय तुला मिळालं आहे तें ह्या तुझ्या बहिणुलीला दाखवायचंस तरी! मी कांहीं खात नव्हतें तुझं!

**उमाजी :** जिजा, आज तुला कांहीं वेडबिड तर नाहीं लागलं ! माझे माय, आजवर मी तुला कधीं विसरलों नाहीं ; मग आजच कसा विसरेन ? जिजा, खरं सांगूं ? एकदा मेणा पाठवून मी बोलावणारच होतों तुला सर्व कांहीं दाखवायला. सोनं, नाणं, जडजवाहिर, याशिवाय किती तरी मौल्यवान कापड-चोपड भरलं आहे, पाहिलंस तर हरखून जाशील.

**पुतळ :** आपल्या बांधवाला म्हणजे आपल्यालाच ती संपत्ती मिळाली आहे असं आपण समजा. समजा कशाला, आपलीच आहे बरं ती !

**जिजा :** पुतळ, तूं अगदीं खरं तेंच सांगितलंस ! माझ्या दादानं आपल्यांत आन् माझ्यांत मुळींच भेदभाव ठेवलेला नाहीं. ( उमाजीच्या दंडावरील कंठ्याकडे पाहून ) दादा, हा कंठा त्याच्यापैकींच का रे ?

**उमाजी :** होय. ( पुतळकडे पाहून ) ह्याच रत्नांपैकीं हा कंठा आहे.

**जिजा :** किती सुंदर आहे हा कंठा ! मन हरखून जातं अगदीं ! बाकीचे जिन्नस जर असेच असतील तर तुमच्या सुदैवाला पारावार नाहीं. मला मात्र विसरूं नका म्हणजे झालं.

**उमाजी :** जिजा, विसरायच्या गोष्टी कशाला ? चल, आतांच सर्व कांहीं तुला दाखवितों, आणि जें काय मागशील तें देऊन टाकतों. ( पुतळला ) काय ग, घरधननी, तुझी कांहीं आडकाठी नाय ना ? नाहींतर म्हणशील कीं, बहिणीचं घर भरलं म्हणून !

**पुतळ :** कांहींतरीच बोलायचं !

**उमाजी :** तुला मी असलों म्हणजे झालं. ( हंसतों. )

**पुतळ :** आपल्यासारखा एक तरी लाल त्या जवाहिरांत आहे का ? सारी संपत्ती आपण आपल्या प्रिय भगिनीला देऊन टाकली तरी चालेल.

**उमाजी :** हा एवढा लाल तुझ्या मालकीचा असला म्हणजे झालं, असंच ना ? ठीक तर. जिजा, मला तेवढं हिच्यापासून नेऊं नकोस. बाकी सर्व कांहीं घेऊन जा.

**जिजा :** मी एखादी हावरी का स्त्री आहे तुझं सर्व कांहीं घेऊन जायला ?

**उमाजी :** तूं घेऊन जाणार नाहींस ; पण खरं सांगतों जिजा, लग्नाचा आहेर म्हणून आम्ही तुला कांहींतरी द्यायचं ठरवलंच आहे.

**जिजा :** खरंच का तूं मला कांहीं देणार आहेस ?

**उमाजी :** खरं म्हणजे ?

**जिजा :** अगदीं मी मागेन तें ?

**उमाजी :** हो हो, तूं मागशील तें.

**जिजा :** बघ, विचार कर. मागाहून बदलशील.

**उमाजी :** जिजा, तुला माझ्याबद्दल अशी शंका तरी कशी आली ? हा उमाजी शब्दाचा घड आहे याची तुला जाणीव आहे ना ? वरचेवर शब्द बदलणाऱ्या दुतोंड्याजवळ आपण बोलतों आहोंत असं का तुला वाटतं ?

**जिजा :** तूं एकदां कबूल केल्यावर आपला शब्द मागं घेणार नाहींस अशी माझी खात्री आहे. पण न जाणो, माणसांत एखादवेळीं फरक होतो.

**उमाजी :** तसा फरक होणारा हा तुझा भाऊ नाहीं हें मी तुला आत्तांच दाखवून देतों. चल तळघरांत.

**जिजा :** दादा, मला पाहिजे असलेला जिन्नस तुझ्या तळघरांत नसून तुझ्याजवळ आहे.

**उमाजी :** हें बघ, जरा सबूर कर. तिकडं तळघरांत असलेल्या नाना प्रकारच्या भारी जिनसा पाहिल्याशिवाय उगीच एखादा हलका जिन्नस मागून घेशील.

**जिजा :** दादा, खरं सांगूं ? मला त्या जिनसा पाहण्याची मुळींच इच्छा नाहीं ! तुमच्या तुम्हांला त्या लखलाभ असोत !

**उमाजी :** मग वरचेवर हडसून खडसून विचारून असं तूं माझ्याजवळ मागणार तरी काय ?

**जिजा :** मी तुझ्याजवळ हाच कंठा मागणार आहें दादा !

**उमाजी :** ( कचरून ) अरेरे काय झालं हें ! करायला गेलों एक आन् झालं भलतंच !

**जिजा :** कां ? दादा, एकदम गोंधळून गेलास ?

**उमाजी :** ( आपल्याशीं ) भलतीच् वस्तु मागितली जिजानं !

**जिजा :** दादा, तूं जरा गोंधळल्यासारखा दिसतोस! हा कंठा मागण्यांत माझी कांहीं चूक झाली होय ? दादा, हें काय ? तूं तर जास्तच थिजत चाललास ! तुझ्या अगदीं आवडीचा कंठा मीं मागितला असं दिसतं !

**उमाजी :** तुझ्या दादाच्या आवडीचा कंठा तूं मागितल्यानं तुझ्या दादाला दुःख होईल असं तुला वाटतं तरी कसं ? माझ्या या पुतळचा प्रेमसंबंध सोडून दिला तर तुझ्याइतकी प्रिय ह्या जगांत मला दुसरी कोणती वस्तु आहे ?

**जिजा :** नाहीं ना ? मग तूं इतका थिजून जाण्याचं कारण ?

**पुतळ :** जिजाबाई, तुम्हीं भलताच जिन्नस मागून घेतलांत.

**जिजा :** ( स्वगत ) हं ! ह्या बयेच्या पोटांत दुखूं लागलं वाटतं ? ( उघड ) भलताच म्हणजे ?

**उमाजी :** जिजा, हा कंठा आतां माझा नाहीं.

**जिजा :** मग कुणाचा आहे, दादा ?

**उमाजी :** मल्हारी मार्तंडाचा. जिजा, हा कंठा मीं माझ्या मल्हारीला अर्पण करायचं ठरवलं आहे. साहेबांचा फारच ताण झाल्यामुळं मला जेजुरीला जातां आलं नाहीं, म्हणून मी तो मुद्दाम माझ्या दंडांतल्या मल्हारीच्या पेटीवर बांधून ठेवला आहे, आन् जमल्यास येत्या संक्रांतीच्या मुहूर्तावर हा मी आपल्या मल्हारीला अर्पण करणार आहें.

**जिजा :** तरी म्हटलं, इतकं गोंधळून जायला झालं काय ? एवढंच ना ? मग त्यांत काय इतकं कोडं आहे ? कुणीकडून खंडोबाला जिन्नस वाहायचा. तो दुसरा वाहतां येईल ! आहे काय त्यांत ?

**उमाजी :** छेः ! छेः ! ! जिजा, मल्हारीला एकदां एक जिन्नस वाहिला तो वाहिला, आतां तो परत घेऊन कसं चालेल ? एखादवेळीं दुसऱ्या माणसाला फसवलं तर चालेल, पण देवाला...माझ्या मल्हारीला मी कसं फसवूं ? जिजा, मी माझ्या मनाला कसं फसवूं ?

**जिजा :** यांत फसवण्यासारखं काय आहे, दादा ? हा कंठा द्यायचा तो तूं दुसरा कंठा देवाला अर्पण कर, इतकंच माझं म्हणणं.

**उमाजी :** तसा दुसरा कंठा अर्पण करून कसं चालेल ? मल्हारी हा मल्लासुराला मारणारा शंकराचा अवतार आहे. हा कंठा मी मल्हारीला म्हणजे

प्रत्यक्ष शंकराला अर्पण केला आहे. एकदां महादेवाला वाहिलेला कोणताही जिन्नस कुणालाही परत घेतां येत नाहीं! शिवनिर्माल्य कुणालाही जयी जात नाहीं हें तुला माहीत आहे ना?

**जिजा :** हो, माहीत आहे. पण तूं मुळींच जिन्नस देवाला वाहूं नकोस, असं कुठं मी म्हणतें. ह्याच्याऐवजीं इतक्याच मोलाचा दुसरा जिन्नस वाहा, इतकंच माझं म्हणणं.

**उमाजी :** तें तुझं म्हणणं अगदीं चुकीचं आहे! सांबाच्या पिंडीवरचं एक बिल्वपत्र काढून घेऊन त्याऐवजीं हाराभर बेल वाहिला म्हणून त्याचा काय उपयोग?

**जिजा :** एकूण हा कंठा तूं मला देणार नाहींस?

**उमाजी :** हा कंठा माझा नाहीं, मग मी तो तुला कसा देऊं, जिजा?

**जिजा :** दादा, आज तुझ्यांत कांहींतरी फरक झाला आहे खास! हा कंठा तो काय आन् त्याकरतां शेंकडों बायज ते काय लावतोस? आज कांहीं माझा पहिला दादा नाहीं खास!

**उमाजी :** आणि जिजा, तूं तरी पहिली राहिली आहेस का? तुझ्यांतसुद्धां कांहींतरी फरक झाल्यासारखं मला वाटतं.

**पुतळ :** मी म्हणतें, त्याच जिनसेकरितां तुम्हीं तरी कशाला इतका हट्ट धरतां? दुसरा एखादा जिन्नस मागून घ्या ना!

**जिजा :** (रागानें एकदम उठून) चला, तुम्ही दोघंही माझ्याशीं बोलूं नका. दादा, लग्न झाल्याबरोबर तुझं हेंच बोलणं मला ऐकावयाचं होतं. मला तुमचे ते बाकी जिन्नस घेऊन काय करायचे आहेत? ते जिन्नस अंगावर घालून चारचौघांत, चावडीवर या रंडकीला मिरवायचंय् होय? माझं मन ह्या कंठ्यावर बसलं आहे, म्हणून तोच माझ्याजवळ असावा असं मला वाटतं. आन् तुम्ही चालवलीत टाळाटाळ!

**उमाजी :** जिजा, तुझ्यासारखी हट्टी स्त्री जगांत सांपडायची नाहीं, हें मला चांगलं माहीत असून आजवर मी तुझा प्रत्येक हट्ट पुरवीत आलों आहे.

**जिजा :** हो, पण आज तर माझा हट्ट पुरवीत नाहींस ना?

**उमाजी :** कां नाहीं ? दुसरा वाटेल तो जिन्नस मागून घे. न दिला तर लाव मला बोल.

**जिजा :** तें मला सतरा पंधरा नको. मला तूं हा कंठा देत नाहींस ना ? देवाला जसं दुसरा जिन्नस वाहून चालणार नाहीं, तसंच मलासुद्धां तुझ्या बाकीच्या जिनसांची जरूर नाहीं. माझं मन ह्या जिनसेवर गेलं आहे. तुझे बाकीचे जिन्नस पुष्कळ चांगले असतील; पण मला ते काय होत ! पाण्याची तहान कांहीं बासुंदीनं भागत नाहीं.

**उमाजी :** आज रंग कांहीं बरा दिसत नाहीं. जिजा मी खात्रीनं सांगतों, वाटेनं येतांना कोणीतरी पिशाच्चानं तुला झपाटलं असावं खास ! एकदां एक मनांत घेतलं म्हणजे तें पुरं केल्याशिवाय तूं राहणार नाहींस हें आजपर्यंतच्या अनुभवावरून मला चांगलं माहीत आहे. पण मी तरी काय करूं ? तूं कांहीं म्हणालीस तरी माझे हात बांधल्यासारखे असल्यानं कंठ्याबाबत मला कांहीं-एक करतां येणार नाहीं.

**जिजा :** ( स्वगत ) कधीं नवत आज माझा शब्द खालीं तर पडलाच ! ( उसळून ) हें पहा, मी झपाटलें नाहीं, पण तूं मात्र एखाद्या लावसटीच्या ताब्यांत गेला आहेस, समजलास ? दादा, आजवर माझ्याकरितां जीव गहाण ठेवणारा तूं, तुझ्या जिवाच्या मानानं कवडीमोल असलेल्या ह्या कंठ्याकरितां मला नाराज करतोस, यावरून तूंच एखाद्या हडळीच्या मोहांत सांपडला आहेस असं मीं कां म्हणूं नये ? कुणी कवटाळणीनं माझ्या दादाला झपाटलं, आणि ह्या बहिणीपासून दूर केलं ! तळपट तळपट होईल मेलीचं !

**पुतळ :** अशा लावून बोलूं नका. माझ्यामुळं हा प्रकार झाला असं तुम्हांला वाटत असेल तर ती तुमची चूक आहे. भाऊ मूळचा चांगला असेल, तर बायकोमुळं आपल्या बहिणीकडं तो कधींच दुर्लक्ष करणार नाहीं. आणि माझ्यासारख्या बायकोमुळं तर नाहींच नाहीं. भावाबहिणींत वितुष्ट आणणाऱ्या कोण नीच बायका असतील त्या असोत; पण मी तशी नाहीं, हें मी तुम्हांला शपथेवर सांगतें. माझ्या धीरोदात्त पतिदेवाचा, बहीण हा एक अत्यंत प्रेमाचा विषय आहे हें मी जाणतें, आणि म्हणून आपण मलाही पूज्य आहांत. तुम्ही बहीणभाऊ जेवायला बसलां, तर तुम्हां दोघांना पंख्यानं वारा घालीत ही

पुतळ उभी राहील, पण तुम्हां दोघांच्या स्वर्गीय प्रेमांत वितुष्ट आणण्याचा प्रयत्न मी प्राणांतींही करणार नाहीं.

**जिजा :** चूप बैस. ही वरकरणीं बोलणीं मला समजतात. नुसत्या बोलाच्या कढीभातानं माणसाचं पोट भरत नसतं. आडपडद्याची भाषा कशाला? तूंच माझ्या भावाला भुरळ घातलीस, आणि वर अशी साखरपेरणी करत्येस? लाज नाहीं वाटत तुला!

**उमाजी :** जिजा............

**जिजा :** गप्प बैस. बायकोचा कड घेऊं नकोस. तू तो कंठा मला देत नाहींस ना? तू तो खंडोबाला वाहणार असलास, तर तुझ्याप्रमाणं तो मी माझ्या भैरोबाला वाहण्याचं ठरविलं आहे. तू तो मला देत नाहींस ना?

**उमाजी :** ( काकुळतीनें ) नाइलाजानं........

**जिजा :** बस्स! पुढचे शब्द नकोत. आईबापांच्या माघारी बहिणीला भावाचं घर पारखं होतं तेंच खरं! ( रडूं लागते ) आतां ही जिजा ह्या जगांत एकटीच राहिली. कुणीसुद्धां तिला आपलं म्हणून राहिलं नाहीं. मीं दादावर इतकं प्रेम केलं, आतडं राहवेना! पण दादानं मात्र माझा गळा कापला...दादानं मात्र माझा गळा कापला......

**उमाजी :** जिजा, मी तुझी कशी समजूत घालूं? जरा बसशील का?

**जिजा :** मी बसत नाहीं, आणि माझी समजूत घालण्याचीही जरूर नाहीं. लग्नाचं कंकण अजून सुटलं नाहीं तोंच तुझ्यांत इतका फरक पडला काय? दादा, तुझं मन जर बदललं आहे, तर मग मला तरी आतां तुझ्या घरीं राहून काय करायचं आहे? सर्व मी समजून चुकलें, बसा आनंदानं पट खेळत. मी उगीच तुमच्या आड आलें. तुझं कांहींएक ऐकण्याची माझी इच्छा नाहीं. ( उमाजीचा हात बाजूला सारून संतापानें निघून जाते. )

**उमाजी :** जिजा, जिजाई!—ही आग एकदां भडकली, म्हणजे देवाच्यानंही शांत व्हायची नाहीं. पिऱ्या, पिऱ्या, जिजीला आडव. ( पुतळला ) चल चल लवकर. आपण जिजीला घेऊन येऊं. ( दोघे घाईनें जातात. )

---

## प्रवेश दुसरा

[ **स्थळ** : दिव्याच्या बाहेरील आंबराईत. कॅप्टन मॅकिन्टॉष व काळोजी उभयतः लष्करी पोषाखांत प्रवेश करतात. ]

**काळोजी** : घाटांतून दिव्याला यायला शेवटीं इतका वेळ लागला; पण आलों आपल्या ठरलेल्या ठिकाणीं. साहेब, तीं दहा पांच आंब्याचीं झाडं दिसताहेत ना, त्याच्यामधला मी म्हणतों तो त्या बाईचा वाडा. आपण आपल्याकडून प्रयत्न करून पाहूं. बघूं कांहीं जमलं तर!

**कॅप्टन** : खाळोजी, कषेंही करून जमायलाच पाइजे. आटां हें प्रखरण अगडीं हाटघाईवर आलेलें हाय. ऊ–माजीला उघड गिरफडार खरायचें म्हटलें टर टें शक्य डिसट नाय. टयाछया वाइफच्या वाड्याछी आपण कषूण झडटी घेटली टरी टो सांपडला नाय. मुरबाडला आमछा खजिना टयानें पषार खेला. आमछया छावणींतबी टो आलाच होटा. सरट्नूली हि इज् ए डेअर डेव्हिल अँड आय् नो नॉट हाउ टु ट्रॅप हिम्. खाळोजी, टूं आपल्या प्रयट्नांछी शिकष्ठ खर.

**काळोजी** : साहेब, तें तुम्ही मला सांगायलाच नको. जे जे उपाय अमलांत आणायचे ते ते मी आणल्याशिवाय राहणार नाहीं. पण आत्तांच खरी परीक्षेची वेळ आहे! आतां ज्या स्त्रीकडून मी मदत मिळवणार आहें, त्या स्त्रीसारखा चमत्कारिक स्वभाव तुम्हांला जगांतही सांपडायचा नाहीं. ती हट्टी म्हणजे पहिल्या नंबरची. त्यांतून तिचं आपल्या भावावर अप्रतिम प्रेम आहे. वळली तर सूत, नाहीं तर निव्वळ भूत आहे. साळीच्या अंगावर हात फिरवायला म्हणून आपण जावं आणि तिनं आपल्या अंगावरले काटे एकदम पिसारावे, तसं ही बया न करो म्हणजे मिळविली. ती जर उलटली तर आपली शरीरं, विशेषेंकरून माझं शरीर रक्तबंबाळ करून टाकील ती बया. त्यांतून पाहतों मी तिला गोंजरण्याचा प्रयत्न करून.

**कॅप्टन** : आच्छा, टूं आपल्या प्रयट्नांछी शिकष्ठ कर आण लागेल टी मडट मागोन घे. वाठेल टेवढ्या पैशाकडे आण् लष्खरकडे पाहूं णकोष. टूं म्हणेल टया ठिकाणीं आम्हीं लष्खर टयार ठेवूं. मडटीबडल एक सेकंडाचीही डिरंगाई होणार नाय.

**काळोजी :** साहेब, आपल्या मदतीबद्दल मला मुळींच शंका नाहीं; पण खरी मदत पाहिजे ती गुप्तपणाची. जितकं कारस्थान महत्त्वाचं तितकं तें जर गुप्त असेल तरच तें पार पडण्याची आशा. साहेब, यापुढं आपल्याला लष्कराच्या हालचाली कराव्या लागतील; त्या तुमच्या आणि माझ्या-शिवाय कुणालाही कळतां कामा नयेत. कुठं जाणार हें लष्करलासुद्धां कळतां उपयोगी नाहीं. साहेब, मी आतां त्या बाईशीं जें कांहीं बोलणार आहे, तें तिच्या घरीं बोलणार नसून त्या ओढ्याच्या कांठीं असलेल्या वडाखालच्या अंधारांत बोलणार आहें. हेंच आपलं पहिलं आणि शेवटचं कारस्थान. हें जर कां फसलं, तर माझे तरी सर्व उपाय हरले म्हणायचे !

**कॅप्टन :** फण, खाळोजी, आपण त्या बाईच्छा घरीं गेलों टर नाय का छालणार ?

**काळोजी :** छेः छेः, साहेब. तिच्या घराचं नांव काढूं नका. आपल्या या हालचालींचा तिच्या पोराला, त्या गंग्याला, नुसता संशय आला कीं, आपलं थोबाड सफशेल फुटलंच म्हणून समजा. तो रोज रात्रीं घरीं येत असतो. अजून रात्रीला अवकाश असला तरी, न जाणो, तो चुकून लवकर घरीं आला तर ? तें कांहीं नाहीं. आतां सर्व गुराखी गुराढोरांना पाणी पाजून आणि गांवांतल्या बायका ओढ्याचं पाणी घेऊन घरोघर परतल्या आहेत. आतां त्या वडाच्या अंधारांत आम्हांला निवांत बोलतां येईल. माझ्या निरोपाप्रमाणं ती बाई आली म्हणजे मी पुढं जाईन, आणि जसा रंग दिसेल तसं तुम्हांला शिटीनं बोलावून घेईन. नच जमलं तर तुम्हांला पुढं येण्याचं कारणच नाहीं. मात्र मी शीट घालतांच आपण पुढं यायचं, आणि माझ्या प्रत्येक शब्दाला आपली संमती द्यायची. साहेब, तुम्ही जरी सरकार असलां तरी त्या बाईशीं तुम्हांला फार जपून वागलं पाहिजे.

**कॅप्टन :** डोंट केअर, खाळोजी, गरजूं माणषानें कषें वागलें पाहिजे हें आम्हा इंग्रज लोकांइटकें डुषरे कोणीबी जाणूं शकट नाय.

**काळोजी :** ठीक आहे तर. त्या पलीकडच्या झाडीमधून कुणीतरी व्यक्ती ओढ्यावरील वडाकडं चाललेली दिसते. आतां मी पुढं होतों, आणि वेळ येईल त्याप्रमाणं तुम्हांला बोलावून घेतों. हो, पण योग्य वेळीं ती दवंडीची व्यवस्था...

**कॅप्टन :** टें बराबर खरटों. पण टूं माट्र जबाबदारीणें वाग. टूं माट्र जबाबडारीणें वाग.

**काळोजी :** त्याबद्दल आपण मुळींच काळजी करूं नका.

**कॅप्टन :** आच्छा ! ( जातो. )

**काळोजी :** सुरुंग भरून तयार तर झालाच. आतां ही गारगोटी ह्या पोलादी गजावर घांसून, चकमकीचा विस्तु पडला कीं, उमाजीच्या चिंधड्यान् चिंधड्या उडायला कितीसा वेळ लागणार ? ही गारगोटी या पोलादी गजावर आदळण्याची जितक्या तीव्रतेनं इच्छा करील, तितकं ह्या काळोजीला पाहिजेच आहे. त्यांतून ती जर आपल्या भावाकडून तापून आली असली तर — हजार हिश्शानं ती तापून येणार अशी माझी खात्रीच आहे — जी दोरी स्वतःच्या गळ्यांत पडायला नको म्हणून मी लांब ठेवीत आलों, ती दोरी सोन्याच्या साखळीसारखी मी माझ्या कंबरेशीं वेढणार आहें. दुसऱ्या एका नागाशीं लग्न लागून त्याच्याशीं रममाण झाल्यामुळें ज्या सर्पिणीला मी टाळीत होतों, तिला मी आपल्या मधुर स्वरानं भारून, गळ्याशीं वेढणार आहें. आणि ज्या आगीच्या तापामुळं मी स्वतःला आजवर दूर ठेवीत आलों, त्या आगीचे निखारे मी आज माझ्या डोक्यावर घेणार आहें. त्या दोरीचा उमाजीची — माझ्या वैऱ्याची नरडी आवळायला, त्या सर्पिणीचा त्याच्या नरडीचा घोट घ्यायला, आणि त्या आगीचा त्याची राखरांगोळी करायला उपयोग केल्याशिवाय मी आतां रहात नाहीं.

[ उजवीकडे निघून जातो. ]

---

## प्रवेश तिसरा

[ **स्थळ :** आजूबाजूला झाडी आहे असा, ओढ्याच्या कांठीं असलेला वडाचा पार. थोड्याच वेळांत जिजा प्रवेश करते. तिनें लुगड्याचा काचा कसलेला असून, डोक्यावर एक हांडा, त्यावर एक घागर व खांद्यावर कोरडें लुगडें आहे. प्रवेश करतांच ती इकडे तिकडे पाहते व नंतर हांडा, घागर व लुगडें पारावर ठेवून देते. ]

**जिजा :** ( स्वगत ) अगदीं किरकिरीत तिन्ही सांज; आणि ह्या वेळीं काळोजींनीं मला इथं बोलावलं ! या पुरातन वडाखालीं भुताची बाधा आहे

असं म्हणतात! हा जर दुसऱ्या कुणाचा निरोप असता तर मी प्राणांतीं तरी इथं आलें असतें का? किती भयाण जागा आहे ही! झाडावरील वटवाघळांच्या किलकिलाटाशिवाय कांहींच ऐकूं येत नाहीं. (हांड्याकडं पाहून) काय चमत्कारिक मन तरी! अशा भलत्या वेळीं कुणाला संशय येऊं नये, म्हणून घागर, हांडा आणि लुगडं घेऊन मी इथं आलें. मन पापी आहे, म्हणूनच तें भित्रेंही पण आहे. एरवीं सर्व कामं मोलकरणीवर सोंपवून इकडची काडी तिकडं न करणारी मी आज घागर घेऊन पाण्याला आलें हें जर कुणी पाहिलं तर त्याला हसूंच येईल. आपणच संशय घ्यायचा आणि आपणच वेडींवाकडीं उत्तरं देऊन मनाचं कसं तरी समाधान करून घ्यायचं, यांतलाच हा प्रकार आहे, नाहींतर काय? कदाचित् मला कुणी पहाणारही नाहीं. पण माझं मन मला पाहताहे. त्यालाच फसवण्याचा मी प्रयत्न करीत नाहीं ना? मी किती वेळ अशीच उभी राहणार? काळूजीनं इथं कशाला बोलावलं आहे कुणाला ठाऊक?... कंठ्याबद्दल तर कांहीं विचारण्याचा त्यांचा विचार नसेल?... तसा विचार असला, तर त्यांना घरीं यायला काय झालं होतं? कांहीं असो, आपणहून तो विषय काढूं नये हेंच ठीक! (खालीं पाहून) जीवजिवाणूं बाहेर पडण्याची ही वेळ. एखादं विषारी जनावर दंश न करो म्हणजे मिळवली! (दूरवर पाहून) कोण येतंयू? कोण येतंयू तें झाडाआडून?

**काळोजी :** (आंतून) मी काळूजी आहें. (प्रवेश करून) म्हटलं निरोपाप्रमाणं येतेस का नाहीं!

**जिजा :** वाः! असं कसं होईल? कुणाच्या निरोपाला यायचं आणि कुणाच्या नाहीं हें मला समजत का नाहीं? हो, आपण केव्हां आलांत?

**काळोजी :** हा आत्तांच आलों. (हांड्याकडं पाहून) जरा लवकर आलों असतों तर फार बरं झालं असतं. छेः! मोठ्याच लाभाला मुकलों म्हणायचा.

**जिजा :** (किंचित स्मित करून) लाभ? कोणता लाभ?

**काळोजी :** एक सुंदर देखावा बघायला मिळाला असता. छेः! चुकलंच तें! हं! आतां काय त्याचा उपयोग?

**जिजा :** हां! फारच हळहळ लागलेली दिसते जिवाला?

**काळोजी :** हो, हळहळ लागण्यासारखाच तो देखावा होता. तारुण्याच्या अगदीं पंधराविशींत नेऊन सोडलं असतं त्या चित्रानं.

**जिजा :** कोणत्या चित्रानं ?

**काळोजी :** काचा कसून हांडा अन् घागर घेतलेल्या या गहिन्या चित्रानं.

**जिजा :** कांहींतरीच बोलायचं !

**काळोजी :** खोटं नाहीं बोलत. त्या तुझ्या चित्रानं या काळोजीच्या जिवाला झोले बसून त्याला अगदीं दंग करून सोडलं असतं !

**जिजा :** अस्सं ! एकूण एवढा ओलावा, इतका जाणतेपणा आहे म्हणायचा ! मला तर वाटलं होत कीं, आपल्या हृदयांत त्या सहजसुलभ पुरुषी भावनेचा गंधही नाहीं, तें अगदीं जीवनरहित ओसाड विहिरीसारखं आहे असं मी समजत होतें.

**काळोजी :** छेः ! छेः ! किती चुकीची समजूत होत होती तुझी, जिजा ! काचा कसून, हांडा आणि घागर डोईवर घेऊन जोंडव्यांचा 'टच, टच' असा कर्णमधुर आवाज करीत, पाणवठ्यावरून जाणारी तुझी मुसमुसलेली छबी मी अद्याप विसरलों नाहीं. आठवण झाली कीं, केवड्याच्या बनांत धुंद बसल्यासारखं वाटतं आणि जिवाला कशी मस्त गुंगी येते ! जिजा, त्यावेळच्या तुझ्या खुपसुरतींत जरा तरी फरक झाला आहे का ? त्यावेळची तुझी नवतीची मूस जशीच्या तशीच आहे, तेव्हां माझी त्यावेळची दृष्टी आज कायम असली तर त्यांत काय नवल ?

**जिजा :** असली तर नशीबच म्हणायचं ! आणि तसंच, या मर्दानी पोषाखांत माणूस किती चांगलं दिसतं, नाहीं ?

**काळोजी :** बरं तें जाऊं दे. हो, पण आपल्या कामाचं काय झालं तें सांग आधीं.

**जिजा :** काळोजी, ती आठवण काढून मला कशाला बरं लाजवतां ? दादाबद्दलच्या कल्पनेंत मी सर्वस्वीं फसलें मीं तो कंठा खंडोबाला अर्पण केला आहे असं दादानं सांगितलं. तो जिन्नस देण्याचं त्यानं सपशेल नाकारलं, आणि त्या बयेनं त्याच्या सुराला सूर दिला. काळोजी, उमाजीदादाकडून माझी अशी मानहानी—त्यांतून त्या बयेच्या देखत होईल याची जर मला थोडी कल्पना असती, तर मी तिथं गेलेंच नसतें.

**काळोजी :** नाहीं. मी म्हणतों, तूं गेलीस हेंच फार चांगलं झालं! तो कंठा तुला कां मिळाला नाहीं, ह्याचं खरं कारण आतां सांगूं तुला?

**जिजा :** कोणचं तें कारण?

**काळोजी :** तूं दादाला एखाद्या वेळीं तरी तो कंठा मागणार ही खात्री असल्यामुळं त्या नवराबायकोंनीं हें देवाचं निमित्त पुढं केलं, समजलीस? खुद्द पुतळच्या घरांतल्या त्या तात्याबाच्या भिमाकडून हें मला समजलं होतं. मी त्याच वेळीं तुला सांगणार होतों. पण तुझा पडला दादावर भलताच विश्वास! पडूं द्या म्हटलं प्रत्यक्ष दांत!

**जिजा :** हो, पण आज आपण मला इथं कां बोलावलं?

**काळोजी :** मोठा साहेब आहे बरोबर; म्हणून घरीं येतां आलं नाहीं. त्याला सोडून कसं बरं येऊं? इथं कांहीं वेळ थांबायचं होतं. म्हटलं तुलाच इकडं बोलावून घ्यावं, आणि घ्यावा एकदाचा तुझा शेवटचा निरोप!

**जिजा :** शेवटचा निरोप! म्हणजे?

**काळोजी :** काय सांगूं, जिजा? माझ्या तोंडून शब्दच फुटत नाहीं.

**जिजा :** अरे देवा, म्हणजे कांहीं संकट आलं कीं काय?

**काळोजी :** या संकटासारखं दुसरं कोणतं संकट असणार? तुझ्याकरितां नोकरी सोडायची म्हटलं, तर अशा नोकऱ्या वेळोवेळीं का मिळतात? तसं म्हणशील तर एवढी मोठी अधिकाराची जागा फारच थोड्यांच्या नशिबीं असते. पांचशें लष्कर हाताखालीं, सरकारी मान आणि चारशें रुपये पगार— कशी नोकरी सोडूं? सांग बरं तूंच! वाटलं होतं माझ्या आशावलेल्या मनाला कीं, आतां तुला आणि मला एके ठिकाणीं एकमेकांच्या सहवासांत राहतां येईल. पण माझं...आपलं दोघांचंही दुर्दैव ओढवलं!

**जिजा :** म्हणजे झालं तरी काय? काळोजी, तुम्ही काय म्हणतां तेंच मला समजत नाहीं. एवढी मोठी नोकरी आन् ती सोडायची काय, आपला विरह कसा होणार, आणि आपलं दुर्दैव कसलं, ह्या तुमच्या शब्दांचा मला कांहींच अर्थ कळत नाहीं! काळोजी, तुमच्या या बोलानं, हृदयावर कसे सुईनं ओरखडे काढल्यासारखे वाटतात!

**काळोजी :** आपला विरह होऊन केव्हां तरी हे ओरखडे आपल्या दोघांच्याही हृदयांवर निघणारच होते. आतांच म्हटलं तें काम उरकावं आणि जिवावरचा भार हलका करावा.

**जिजा :** पण असं झालं तरी काय ? आपला विरह काय म्हणून होणार ?

**काळोजी :** जिजा, काय सांगूं ? साहेबानं सांगितलेली कामगिरी माझ्या हातून पार पडली नाहीं, म्हणून पांच वर्षांच्या मुदतीनं साहेबानं माझी पंजाबाकडं बदली केली आहे. आतांच मला निघावं लागणार. जगलों वांचलों, तर होईल आपली भेट !

**जिजा :** म्हणजे खरंच आपली ताटातूट होणार ?

**काळोजी :** हो खरंच होणार ! या घटकेला होणार. माझ्याकडून कामच झालं नाहीं, मग साहेबाकडं तरी काय दोष ? त्यानं वर रपोट केला आणि...

**जिजा :** पण त्याच्या हातींपायीं पडलं, तर नाहीं का कांहीं होणार उपयोग ?

**काळोजी :** छेः ! कसचा होतो उपयोग ? अग ह्या साहेबांची रीत तुला ठाऊक नाहीं. काम करणाराच माणूस त्याला प्रिय असतो. वायफळ बोलण्याला आणि फुकाच्या विनवण्यांना ते कधींच भाळत नाहींत. हातीं पायीं पडून काय होणार उपयोग ?

**जिजा :** होईल उपयोग ! मी चलतें साहेबाकडं आणि त्याच्या पायांवर नाक घांसून, तुम्हांला इथं ठेवून घेतें. मी तुमच्या लग्नाची बाइल आहे असं त्याला भासवतें, म्हणजे त्याला खात्रीनं दया येईल. आणि मी म्हणतें, आपलं जरी प्रत्यक्ष लग्न लागलं नसलं, तरी तुम्ही माझे मनोमन साक्षी पतीच आहांत, नाहींतर काय ? काळोजी, माझं मन मला सांगतंय् कीं, नवराबायकोची ताटातूट होत आहे हें पाहून, साहेबाला खात्रीनं दया येईल !

**काळोजी :** वेड लागलंय् तुला ! नवराबायकोची का कुठं साहेबाला दया आली आहे ! माझ्या मैने, आपल्यासारखं का या साहेबलोकांचं प्रेम असतं ? मी त्याला नानातऱ्हेनं सांगितलं, तेव्हां तो म्हणाला कीं, तूं तिकडं गेल्यावर दुसरं लग्न कर. जिजा, या लोकांची रीत तुला ठाऊक नाहीं. विलायतला पांच हजार कोसांवरही बायकामुलं ठेवून ते इथं येतात.

**जिजा :** मग त्या मडमा बरोबर असतात त्या ?

**काळोजी :** अग वेडे, त्या इथं आल्यावर केलेल्या.

**जिजा :** वाः ! फार छान !

**काळोजी :** मग सांगतों काय तुला ?

**जिजा :** हो, पण कामगिरी तरी काय आहे साहेबांची ? इकडचा डोंगर तिकडं तर ठेवायला सांगितलं नाहीं साहेबानं !

**काळोजी :** अग, तें डोंगर उचलण्याचं काम मीं सहज पार पाडलं असतं ग !

**जिजा :** इतकं का कठीण काम आहे ? मग सांगा तरी. काळूजी मीही आपल्याला मदत करण्याची शिकस्त करीन ! माझ्या सर्व इच्छा मातीमोल होण्याची वेळ आली असतांना, मी स्वस्थ कशी बसेन ? आपण दूर देशीं निघून जाणार, आणि मी रानच्या पांखरावाणी वनवाशासारखे दिवस काढणार, ही कल्पना किती दुःसह आहे ! काळोजी, मनुष्य आशेवर जगत असतो. आशेच्या आधारानं बायका वाटेल तो भयंकर कडा चढून जातात !

**काळोजी :** तशी तूं जाशील ?

**जिजा :** हें काय विचारतां, काळूजी ?

**काळोजी :** बघ ! कचरशील, माघार घेशील !

**जिजा :** तुमच्याकरतां प्राणांतींही माघार घेणार नाहीं.

**काळोजी :** अस्सं ! तर मग तुझ्यावर प्राणापलीकडं प्रेम करणाऱ्या ह्या काळूजीच्या गळ्याची शपथ घे पाहूं !

**जिजा :** शपथ कशाला ? या जिजाचा शब्द हीच शपथ आहे ! त्यांतून तुमची खात्रीच होत नसेल, तर शपथेवर सांगतें कीं तुमच्याकरतां जळता निखाराही हातांत घ्यायला मी माघार घेणार नाहीं.

**काळोजी :** ठीक तर ! सांगतोंच तुला. ( साहेबाच्या बाजूकडे सहज पाहतो. लगेच आंतून उजवीकडून दवंडी होते. )

### दवंडी

ऐकाहो ऐका. ध्यान देऊन ऐका. कुंपणी सरकारच्या आणि भोर
सरकारच्या आज्ञेवरून जो कुणी उमाजीला जिवंत अगर
मेलेला पकडून देईल, त्याला एक लाख रुपयाचा
तोडा व सरकारांतून बहुमान मिळेल हो–

**काळोजी :** हीच ती कामगिरी ! पाहिलंस, ही कामगिरी ऐकतांच तूं कशी थिजून गेलीस ती ? जिजा, उमाजीला पकडून देण्याची साहेबानं मला कामगिरी सांगितली होती, पण ती पार पडणं माझ्या एकटयाच्यानं कधीं तरी होईल का ?

**जिजा :** ( काळूजीकडे पहात राहून ) किती भयंकर अट आहे ही ?

**काळोजी :** तुझ्या दृष्टीनं ती खरोखरच भयंकर अट आहे.

**जिजा :** ( पूर्ववत् त्याच्याकडे पहात राहून ) दादाला जर पकडून दिला नाहीं तर –

**काळोजी :** तर काय ? मला आतांच पंजाबाकडं रोजगाराला जावं लागणार !

**जिजा :** ( आपल्याशीं ) किती चमत्कारिक वेळ आणली दुर्दैवानं ?

**काळोजी :** आणली खरी ! पण आतां त्याला काय करणार ? ( क्षणभर थांबून, नंतर अडखळत ) बदली न व्हावी म्हणून साहेबानं एक तोड सुचवली, पण ती थोडीच पार पडते ?

**जिजा :** कोणती ती तोड ?

**काळोजी :** तूं उमाजीला पकडून द्यावंस असं साहेब म्हणत होता. तें तुझ्या हातून होणार आहे होय ?

**जिजा :** ( दुःखाश्चर्यानें ) काय ? माझ्या भावाला मी पकडून देऊं ? माझ्या दादाला मी पकडून देऊं ?

**काळोजी :** साहेबानं सहज तसं सुचवलं झालं ! असं कधीं झालंय् ?

**जिजा :** ( स्वगत दुःखानें ) काय प्रसंग आला हा ! दादाला मी पकडून देऊं ?

**काळोजी :** जाऊं दे ! विचार करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. उगीच लेच्यापेच्या माणसाचं कांहीं तें काम नाहीं. प्रेमाकरतां वाटेल तें दिव्य करणारीं, निधड्या छातीचीं माणसं लागतात त्याला ! तुझ्यावरच्या माझ्या प्रेमांत, जर असा कांहीं अडथळा आला असता तर भाऊच काय, पण आईचं नरडंही कसाबाच्या हातीं द्यायला मीं मागंपुढं पाहिलं नसतं ! प्रेमाकरितां वाटेल ती किंमत द्यायला तयार होत नाहीं, तें प्रेम कसचं, ह्या निश्चयाचा आहे मी...मी आहे, पण तूं तशीच हो असं मी कसं म्हणूं ?

**जिजा :** काळोजी, प्रेमाकरतां वाटेल तें दिव्य करायला पाहिजे, आणि मी तें करीनही. पण काळोजी, त्याला कांहींतरी मर्यादा पाहिजे—

**काळोजी :** मर्यादा पाहिजे, तर मग तें प्रेमहि मर्यादितच; आणि मग, त्याची लज्जतही तितकीच. साहेबच काय, मीच तुला उमाजीला पकडून देण्याबद्दल विचारणार होतों; पण म्हटलं, शब्द झेलला जातोय् का नाहीं? उगीच कशाला हात दाखवून अवलक्षण करून घ्या! नाहीं देवानं आपल्या नशिबीं आपल्या जिवाच्या माणसांची संगत ठेवली, त्याला कोण काय करणार? (दोन पावलें जाऊं लागतो. आणि हलकेंच परत वळून, सावकाशीनें) आणि मी म्हणतों जिजा, केलास, हिय्या तर काय होईल? (किंचित कचरून) नाहीं, नीट विचार कर.

**जिजा :** कसला विचार? काळोजी, दादाला साहेबाच्या हातीं देण्याचा मी हिय्या करूं?

**काळोजी :** नाहीं, मी म्हणतों, काय होईल? होईल काय?

**जिजा :** काय होईल म्हणून काय विचारतां, काळूजी? बहिणीनं भावाला मृत्यूच्या जबड्यांत ढकलल्यासारखं होईल!

**काळोजी :** मृत्यूचा जबडा! उमाजी जसा कांहीं अमरपट्टाच घेऊन जन्माला आलाय्? आणि मी म्हणतों, समज तूं त्याला पकडून दिलं नाहींस, आन् साहेबाच्या गोळीला तो एखादवेळीं बळी पडला तर काय करशील? आन् एवढ्या मोठ्या सरकारच्या हातून तूं त्याला वांचवणार आहेस होय?

**जिजा :** (कळवळून) मी त्याला कशी वांचवणार? अहोरात्र वाघाच्या कपाळावर टिचक्या मारून हरघडीला स्वतःचा जीव धोक्यांत घालणाऱ्या दादाला मी अबला कशी वांचवणार?

**काळोजी :** मग झालं तर!

**जिजा :** दादाला वांचवतां आलं नाहीं म्हणून मी त्याला मृत्यु कसा देऊं? फुलझाडाला पाणी घालतां आलं नाहीं, म्हणून त्याला जर कुणी तोडून टाकलं, तर तें कसं होईल?

**काळोजी :** हं! मी म्हणतों तेंच हें वेड! फुलझाड म्हणे फुलझाड! अग फुलझाड कसलं? कांटेरी निवडुंग आहे तो! तूं त्याला कवटाळ, आणि त्याचें

कांटे तुझ्या अंगांत मोडूं दे. छट्! उगीचच वाटत होतं मला, कीं माझ्या जिजाच्या हृदयांत या एकट्या काळोजीलाच जागा आहे म्हणून!...पण हिचं हृदय भरलंय् शब्दहि न मानणाऱ्या दादाच्या प्रेमानं.

**जिजा :** केवळ दादाच्याच नाहीं, तर आपल्याहि बद्दलच्या प्रेमानं हें हृदय ओतप्रोत भरलं असलं, तरी ही भयंकर गोष्ट करायला तुम्ही मला सांगूं नका. दादानं माझा एक शब्द मानला नाहीं म्हणून, काळूजी, मी त्याला मृत्यूच्या जबड्यांत कधींच देणार नाहीं! मग त्या बाबतींत माझ्या प्रेमाची राखरांगोळी झाली तरी मला चालेल.

**काळोजी :** (दिङ्मूढ होऊन स्वस्थ उभा राहतो. कांहीं वेळानें) (स्वगत) छेः! फारच कठीण आहे. आतां आणखी एक कोलांटी घेतली पाहिजे. (हलकेंच जवळ जाऊन) (उघड) जिजा, जिजा, तूं उमाजीला पकडून दिलंस तर तो मरणारच असं तूं कशावरून धरून चालतेस?

**जिजा :** (किंचित् आशेनें) काय? त्याला सरकार मारणार नाहीं?

**काळोजी :** छट्! मुळींच नाहीं. उमाजीसारख्या शूर माणसाला मारण्यापेक्षां जिवंत ठेवण्याकडंच सरकारचा कल असतो.

**जिजा :** कल असतो ना? मग तो कल त्याला मारण्याकडंच कलला तर!

**काळोजी :** त्याबद्दल तुझी खात्री पटवून द्यायला मी तयार आहें. हें बघ, जिजा, मी तुला आतां स्पष्टच विचारतों. हें बघ, तूं उमाजीला पकडून दिलंस, तर त्या क्षणीं तुला एक लाख रुपये इनाम मिळून, माझी मोठ्या जागेवर नेमणूक होईल. शिवाय गंग्याला लष्करांत मानाची जागा मिळेल ती निराळीच. पहा, तूं आणि मी एकमेकांच्या सहवासांत, एके ठिकाणीं राहायला याशिवाय कांहीं दुसरा मार्ग नाहीं. तूं मला वांचवलंस, त्याचं कांहींतरी सार्थक कर, जिजा. (जिजा विचार करूं लागल्यावर, दोन पावलें बाजूला जाऊन, हातानें कंबरेची दोरी वळण्याचा चाळा चालूं ठेवतो.)

**जिजा :** (स्वगत) आतां काय बरं करूं? केवढा पेंच येऊन पडला! दादाला मी पकडून देऊं? पुतळाच्या मोहानं दादा जरी या जिजाला पारखा झाला असला, तरी तो पकडला जाऊन त्याच्या जिवाचं बरंवाईट होण्यानं, ह्या जिजाला कसं बरं वाटेल? दादाला पकडून देऊन, तो कदाचित मारला गेला,

तर ह्या जिजाला जन्मभर तरी सुख लागेल का? दादाला पकडून दिल्यानं काळोजीच्या सहवासांत या जिजाला आनंदांत दिवस काढतां येतील—हो, येतील खरे! पण त्या आनंदांत मी रमून गेलें असतांना, मला जर माझ्या दादाची आठवण झाली तर... गादीच्या जोड्यांतून एखादा कांटा भोंसकला जावा तशी या जिजाची अवस्था होऊन, हिच्या सर्व सुखाचा विरस होईल. सर्वस्वाची माती होईल. बरं दादाला न पकडतां, काळोजीला मीं गमावलं तर... जिजाचं आयुष्य मातीमोलच होणार! मग माझं असं या जगांत काय राहिलं आहे?... बरं, दादाला जिवंत ठेवण्याच्या अटीवर जर मीं त्याला पकडून दिला, तर माझ्या आजपर्यंतच्या इच्छा अजूनही सफल होतील. कैदेंत का होईना, दादा जिवंत राहून, जर काळोजीचा सहवास मिळवतां आला तर मिळवणं, ह्याशिवाय या जिजाला आतां दुसरा मार्ग नाहीं. (स्वस्थ उभी राहते.)

**काळोजी :** कसला विचार चालला आहे जिजा? साहेब पलीकडं उभा आहे. जाऊं दे मला. (जाऊं लागतो.)

**जिजा :** जरा थांबा, काळोजी, एका गोष्टीची माझी खात्री करून द्या. मी पहातें प्रयत्न करून.

**काळोजी :** आतां कसली खात्री करायची आहे तुझी, जिजा?

**जिजा :** दादाच्या जिवाची. काळोजी, दादाला जिवंत ठेवण्याचं जर साहेबाकडून तुम्हीं मला वचन देत असाल तर त्याला मी तुमच्या स्वाधीन करायला तयार आहें.

**काळोजी :** भले शाबास, जिजा! अग, वचन काय, तसं तुला साहेबाकडून कागदावर लेखी लिहून द्यायला मी तयार आहें.

**जिजा :** पहा, यांत विश्वासघात होतां कामा नये!

**काळोजी :** वेड आहे काय? कागदावर एकदां लेखी लिहून दिल्यावर साहेबांनीं जर कांहीं उमाजीच्या जिवाचं बरंवाईट केलं, तर तुला राजावर फिर्याद करतां येईल. बोलावूं साहेबाला?

**जिजा :** बोलवा, पण काय करायचं तें नीट विचारानं करा.

**काळोजी :** तें माझ्याकडं लागलं. तुझ्या जिवाला धक्का तो माझ्या जिवाला धक्का! (दोनदां शिट वाजवितो. कॅप्टन येतो.) साहेब, माझी

बदली न व्हावी म्हणून उमाजीला पकडून द्यायला ही माझी बायको तयार आहे. पण तुम्ही उमाजीच्या जिवाला धक्का न लावण्याची हमी घेऊन तसं कागदावर लेखी लिहून दिलं पाहिजे, साहेब !

**कॅप्टन :** बहोत आच्छा ! आम्हांला त्याला मारुनशाण खाय खरायछें हाय ? आम्ही त्याला स्वष्ठ बसूनशाण ठेवणार म्हणजे झालें !

**काळोजी :** आन्, साहेब, त्याला स्वस्थ बसवून ठेवण्याकरितां काय काय व्यवस्था तुम्हीं केली आहे, हें तुम्हीच हिला सांगा. पुण्यांत बंगला बांधला आहे, पांचशें रुपयांची पेन्शन सुरू केली आहे, आहे का नाहीं तुम्हीच सांगा. ( कॅप्टन प्रत्येक वेळीं " जरूर " " जरूर " असें म्हणतो.) उमाजीनं उगीच सरकारची अवाडाव करूं नये, म्हणून तर त्याला स्वस्थ बसवण्याचा हा खटाटोप !

**जिजा :** ( साहेबाच्या जवळ येऊन ) साहेब, कसाही असला तरी आपला भाऊ मरावा असं कोणच्या बहिणीला वाटेल ? तुमच्या बहिणीला वाटेल का, साहेब ? तुम्हांलाही बहीण असेल ! तुम्ही मरावं, असं तिला कधीं वाटेल का ? खरंच सांगा हं मला !

**कॅप्टन :** कढींबी वाटणार नाय.

**जिजा :** आपलं वाटतं, निदान त्याच्या पोटाचे तरी हाल होऊं नयेत.

**काळोजी :** हाल कसले त्यांत ? बरं, पुढं काय करायचं ?

**जिजा :** हें पहा, उद्यां आहे संक्रांतीचा सण. जेवायला म्हणून दादाला गंग्याकडून बोलावून घेतें. पुढची व्यवस्था तुम्ही करतांच आहांत. आतां जरा वेळानें गंग्या घरीं येईल, रातोरात पाठवतें त्याला.

**काळोजी :** ठीक आहे. जा तूं आतां. पण हें पहा, तूं, मी आणि साहेब— आपल्या तिघांशिवाय ह्या कारस्थानापैकीं कुणाला कांहीं एक कळतां कामा नये. ध्यानांत ठेव.

**जिजा :** त्याबद्दल तुम्ही निर्धास्त रहा. ( डावीकडून जिजा जाते. ती गेली असें पाहून, कॅप्टन काळोजीच्या पाठीवर आनंदानें थाप मारतो. )

**कॅप्टन :** वेल् डन्, वेल् डन् ! खाळोजी, ग्रँड सक्सेस् ! ( दोघेही आनंदानें उजव्या बाजूनें निघून जातात. )

---

## प्रवेश चौथा

[ **स्थळ :** पुतळच्या वाड्यांतील दिवाणखाना. पलंगावर उमाजी झोंपला असून, शेजारीं पुतळ बसलेली आहे. जवळच भिमा उभी आहे. ]

**भिमा :** पण बाईसाहेब, सोजिर कसं मुंग्यावानी रानोमाळ नायकांच्या मागावर फिरत असतांना, जेजुरीला खंडोबाच्या दर्शनाला जायचं ठरवलं कसं नायकांनीं ?

**पुतळ :** मी तरी काय करूं ? परोपरीनं मीं सांगितलं, तरी तिकडं दुर्लक्ष करून, जेजुरीला जायचं ठरवलंच. मल्हारीचं दर्शन घेतल्याशिवाय मनाला बरं वाटणार नाहीं असा झाला आहे मनाचा ग्रह !

**भिमा :** खरंच पुतळबाई, नाईक आतांशा काळजींत कां दिसत्यात ? कसल्याबी परसंगीं त्येंच्या तोंडावर इक्ती काळजी आपल्यासनी कधीं तरी दिसली हाय का ? अलीकडं, इरबळ त्ये दुःखांत दिसत्यात, काय तरी घोर लागलाय धन्यांच्या जिवाला ! कां बरं असं व्हवं ?

**पुतळ :** काय सांगूं भिमाबाई ? तशी मनाची चमत्कारिक स्थिती झाली आहे खरी धन्यांची. जिजाबाई चार दिवसांपूर्वी येऊन रागावून निघून गेल्यामुळं, धन्यांच्या वृत्तींत फारच फरक झाला आहे. बहिणीला आडवून परत आणण्याचा त्यांनीं किती प्रयत्न केला ! पण त्या ज्या वाड्याबाहेर पडल्या त्या पडल्या. त्यांनीं मागं वळूनही पाहिलं नाहीं. जिजाबाई रागावून गेल्यापासून, धन्यांना जेवण गोड लागत नाहीं कीं झोंपही येत नाहीं. रात्रींच पहा ना ! दोन वाजेपर्यंत झोंप नव्हती. माझी जिजा माझ्यावर रागावून गेली, काय करूं ? असं उसासे सोडून, सारखं म्हणणं होत होतं. शेवटीं जेजुरीला निघतांना, तीनशें कडवे लोक बरोबर घेण्याची पिऱ्याला आज्ञा दिल्यावर, पहाटें झोंप आली स्वारीला.

**भिमा :** बहिणीवर असं जिवापल्याड पिरेम करनारा भाऊ जगांत तरी सांपडंल का ? असाच जीव लावणारा भाऊ आपल्याला जन्मोजन्मीं मिळावा, असंच समद्या बहिनींना वाटल्याबिगर राहनार नाय.

**पुतळ :** खरं म्हणतां तुम्ही !

**भिमा :** बरं, मग्नी आनकी काय सांगायचं व्हतं ?

**पुतळ :** दुसरं कांहीं नाहीं, मीं आतां सांगितलं सारं सामान नीट बांधून बरोबर घ्या, घऱ्यांना जाग आणून येतेंच तुमच्या मदतीला. (भिमा जाते.) (उमाजीकडे शांतपणानें पाहून स्वगत) ह्यांच्या मनाला बरं वाटण्याकरितां मी काय बरं करूं? मन रमवण्याचा मी रात्रंदिवस प्रयत्न करतें, पण स्वारीचं लक्ष कुणीकडंच लागत नाहीं. जिकडं जिकडं मी मन वळवण्याचा प्रयत्न करावा, तिकडं तिकडं माझ्या मनाच्या समजुतीकरतां क्षणभर लक्ष द्यायचं, आणि एकदम गोंधळून जायचं! काल रात्रीं, सारीपट खेळण्याकरितां म्हणून मीं आग्रह केला. दोनदां दान घेतलं, आन् सांगायचं झालं कीं, रंग नाहीं खेळाला. त्या दिवशीं सारीपटाचा खेळ खेळतांना जिजाबाई आल्या... ऐन रंगांत आल्या, तोच आमचा शेवटचा खेळ! काय होतंय् यांच्या जिवाला? बहीण रागावली म्हणून इतकं कांहीं वाईट वाटायला नको, असं मीं सांगितलं, तेव्हां सांगणं झालं कीं, जिजा माझ्यावर आजवर कधीं रागावली नाहीं ग! मग मला हुरहुर लागल्याशिवाय कशी राहील? पण आतां मी तरी काय करूं? जीव गहाण ठेवला तरीसुद्धां यांच्या जिवाची तळमळ थांबायची नाहीं. चेहरा किती उतरून गेला आहे! अरे देवा, हें काय? डोळयाला पाणी! कांहीं वेडंवाकडं स्वप्न पडतंय् कीं काय! (दंडाला धरून हालवून) जागं व्हायचं ना? (उमाजी उठून बसतो.) काय झालं? डोळ्याला पाणी कां?

**उमाजी :** (स्वप्नस्थितींत, पण डोळे उघडून) कोण! माझा मल्हारी? आन् जेजुरीच्या राजा, रडतोस कां? माझ्या प्रेमाकरितां रडतोस? माझ्या जिवाचा काच तुला सहन होत नाहीं म्हणतोस? पण तुझ्याजवळ आल्यावर तर माझ्या जिवाला कसला काच नाहीं ना राहणार? (त्या स्थितींत पुढें येतो. पुतळ त्याला सांवरण्याचा प्रयत्न करिते.)

**पुतळ :** काय हें? अंगावर कसा काटा आला सरकन्! घाम कसा दरदरून सुटला आहे! काय झालं? कसलं स्वप्न कां पडलं? आपण स्वस्थ बसायचं जरा!

**उमाजी :** आतां कसची स्वस्थता? एकदां मनाचा बिघाड झाला तो झाला!

**पुतळ :** असं काय बरं बोलायचं! कसला बिघाड? काय होतंय् आपल्याला?

**उमाजी :** मला काय होतंय्? खरं पुसशील तर मला कांहींच कळत नाहीं. (छातीवर हात ठेवून) पण इथं कांहीं तरी होतंय् खरं! त्याला शब्दच फुटत नाहीं. आणि आजच्या दृष्टांतामुळं तर...

**पुतळ :** कसला दृष्टांत झाला? कांहीं स्वप्न का पडलं? सांगायचं ना मला!

**उमाजी :** काय सांगूं? जिजा रागावून गेल्यापासून...

**पुतळ :** हो, तें मला माहीत आहे! दुसरंच काय बरं बोलायचं?

**उमाजी :** (गोंधळून) मी काय म्हणत होतों?

**पुतळ :** असं काय करायचं? मला स्वप्न सांगायचं ना?

**उमाजी :** हो, बरोबर. स्वप्न नीटसं मला आठवत नाहीं, पण माझ्या मल्हारीचे उद्गार तेवढे मला आठवतात. (रडूं लागतो.)

**पुतळ :** काय उद्गार होते ते?

**उमाजी :** हें बघ, माझ्या शिस्तीच्या विरुद्ध लोक वागतात, म्हणूनच मी त्यांना शिक्षा करतों. काळोजीला अन् इतर लोकांना शिक्षा केल्या त्यांत माझा काय बरं दोष?

**पुतळ :** मी कुठं म्हणते कीं दोष आहे म्हणून!... पण हें नको होतं मला! स्वप्न काय पडलं तें सांगायचं ना आधीं!

**उमाजी?** (पुन्हां गोंधळून) हें बघ, चक्रांत सांपडल्यासारखी स्थिति झाली आहे माझी! जीं जीं चित्रं मीं स्वप्नांत पाहिलीं, तीं तीं... पण हें बघ, अजून मी चांगला बरा... नाहीं, चांगला जागा झालों वाटतं. (शून्य दृष्टीनें उभा राहतो.) जिजा, जिजा! गेलीच ती! (पुन्हां रडूं लागतो.)

**पुतळ :** सारखे बहिणीबद्दलचे विचार चालू आहेत. काय हें बहिणीवरचं प्रेम! हें पहा, या आपल्या चमत्कारिक वागणुकीनं मी अगदीं गोंधळून गेलें आहें. नीट शुद्धीवर यायचं. आपण जर असं वागूं लागलांत तर मी काय बरं करूं? (त्याच्या खांद्यावर डोकें टेकते.)

**उमाजी :** (तिच्या डोक्यावर हात ठेवून) कोण? जिजा! (पाहून) नव्हे पुतळ! हो. आतां तूंच एकटी माझ्या जिवाची सोबतीण राहिली आहेस. काळोजीला मीं दुखवलं; जिजा मला सोडून गेली. पण तूं नाहीं ना मला सोडून जाणार? तूं नाहीं ना मला सोडून जाणार?

**पुतळ:** काय हें! भिमा भिमा! (भिमा येते.)

**भिमा :** काय बाईसाहेब?

**पुतळ :** थोडं पाणी आण बरं लवकर. (भिमा जाते.)

**उमाजी :** (आपल्याशीं) जिवा मला सोडून गेली! जिवा मला सोडून गेली!

[भिमा पाणी घेऊन येते. पुतळ तें पाणी उमाजीच्या डोळ्यांना लावते. भिमा निघून जाते.]

**उमाजी :** (सावध होऊन) हं, आतां मी सुटलों बघ, त्या चक्रांतून. (इकडे तिकडे पाहून) हां, आतां मी जागा झालों. हें बघ, बोलण्याचा उमजच पडेना मला. आतां मी चांगला जागा झालों.

**पुतळ :** खरं का पण हें?

**उमाजी :** खरं, अगदीं खरं. आतां सांगूं? माझ्या जिवाचा काच माझ्या मल्हारीला सोसवत नाहीं ग! मल्हारीनं डोळ्यांत आसवं आणली आणि मला म्हणाला, 'उम्या फार दमलास. ये आतां माझ्याजवळ. जगांत तुझा गळा कापणारे लोक फार झाले. पुरे झाला हा खेळ.'

**पुतळ :** देवा रे देवा! काय हें स्वप्न! अंगावर कसा काटा आला सरकन्!

**उमाजी :** पुढं ऐक. मल्हारीच्या म्हाळसानं — त्या माझ्या आईनं मला हातानं खुणवून सांगितलं कीं, कोणाच्या मोहांत पडूं नकोस म्हणून!

**पुतळ :** खरं का हें? मग खरंच सांगतें, जेजुरीला जाण्याचा बेत आपण आज रहित करावा.

**उमाजी :** (एकदम दूर होऊन) वाः! फार छान आहे तुझा विचार! मल्हारीच्या दर्शनाला जायचा बेत मी रहित करूं? माझ्या पाठीशीं हरघडी उभा असलेल्या मल्हारीला भेटायला जात असतां, कुणाची माय व्याली आहे मला पकडायला?

**पुतळ :** मग आज निघायचं म्हणायचं.

**उमाजी :** हो. आज मी जेजुरीला खात्रीनें जाणार. शिवाय, पुतळ, मी माझ्या मनांत एक योजना ठरविली आहे. ती मल्हारीच्या पायांवर शपथा घेऊन मी माझ्या लोकांकडून अंमलांत आणणार आहें. माझे सर्व लोक एकत्र करून तमाम दख्खनभर जाळं पसरण्याचे माझे विचार चालू आहेत, आणि माझ्या बंधवाला – त्या वीर भुजाबाला मल्हारीसमोर सर्व सैन्याचा नायक करण्याचा माझा विचार आहे.

**पुतळ :** असं असेल तर फारच चांगलं ! असे स्फूर्तिदायक विचार पुरुषांच्या तोंडून आम्हां बायकांना ऐकायला मिळाले म्हणजे आम्हांला कसं स्फुरण चढतं ! पण मघांसारखे दुबळे विचार मनांत आणून कसं बरं चालेल ?

**उमाजी :** कसले दुबळे विचार ? पुतळ, मी मनुष्य आहें. कांहीं नाजूक भावनांनीं मला सोडलेलं नाहीं !

**पुतळ :** मी कुठं म्हणतें कीं, नाजूक भावनांना अजिबात फांटा द्या म्हणून ! पण, कांहीं म्हणा, परवां जिजाबाई रागावून गेल्यापासून तुमची चित्तवृत्ति कांहीं ताळ्यावर नाहीं. सगळं जगानिराळंच ! जगांत कुणाला बहिणी नसतातच जशा !

**उमाजी :** पुतळ, काय सांगूं ? माझी जिजा लहानपणापासून माझ्यावर रागावली नाहीं ग ! आई गेल्यापासून या उमाजीनं तिला तळहाताच्या फोडासारखी जपली आहे. शिवाय प्रेमाला माप का असतं ? खरंच सांगतों, ज्या दिवशीं जिजाचा राग जाऊन ती माझ्याकडं आनंदानं पाहील, तो दिवस मी भाग्याचा समजेन ! ती हट्टी आहे. तिची समज मी कशी घालूं ?

**पुतळ :** आज नाहीं उद्यां त्यांना आपली चूक समजून येईल, बरं का !

[ गंगाराम आनंदांत प्रवेश करतो. ]

**उमाजी :** कोण ? गंग्या ? आन् तूं केव्हां आलास ? दिव्याला गेला नाहींस वाटतं, पोरा ?

**गंगाराम :** गेलों होतों, पण त्याच पावलीं घोड्यावर मांड टाकून परत आलों.

**उमाजी :** कां रे ?

**गंगाराम :** कां तें सांगितलं तर तुम्हीं या गंग्याला उचलून घ्याल !

**उमाजी :** म्हणजे असं झालं तरी काय ?

**गंगाराम :** ( पुतळला ) मामी, उद्यांचा सण कसला आहे ?

**पुतळ :** संक्रांतीचा.

**गंगाराम :** हां ! मग त्या सणाला मामांस्नी जेवायला बोलावलंय् आईनं.

**उमाजी :** ( अत्यानंदानें ) अहा रे माझ्या वाघा ! ( त्याला कवटाळतो. )

**गंगाराम :** मामा, पूर्वीचं मनांत कांहीं एक न ठेवतां, अगत भोजनाला ये ; नाहीं आलास तर गळ्याची शपथ आहे, असा आईचा निरोप आहे.

**उमाजी :** गंग्या! वासरा, तुला कुठं ठेवूं रे! सहा महिन्याचं दुखणं घालवलंस बघ मामाचं.

**गंगाराम :** पुढं घालून घेऊन नाहीं आलास मामाला, तर दिंडी दरवाज्यांत तंगडी मोडीन असं आईनं सांगितलं आहे.

**उमाजी :** अग कशाला म्हणावं तंगडी मोडतेस! हा बघ, मी तुझ्या म्होरं झालोंच म्हणून समज. हो पण, गंग्या, उद्यांचा आपला जेजुरीला जमण्याचा बेत...

**गंगाराम :** तें मीं सांगितलं आईला. पण ती म्हणाली, पंचामृत भोजन तयार करून मामा-भाच्यांचीं ताटं वाढून कोयंड्यांत पळी अडकवून वाट पहात बसतें. जेजुरीला जाण्यांत माझ्याकडून स्वयंपाकाचा कांहीं खोळंबा व्हायचा नाहीं. मामाभाचे दोन गोड घांस खा, आन् घोड्यावर मांड टाकून धरा जेजुरीची वाट.

**उमाजी :** मग बेस काम केलंस न् काय. ठरलं तर मग! स्नान उरकून, भंडार लेवून, दिव्याकडं घोडे दवडायचे, आन् भोजन करून जेजुरीकडं वळायचं. गंग्या, तुझ्या धाकट्या मामाला भुजाबाला सांगावा धाड कीं, दरोबस्त गांवगन्ना आन् दऱ्याखोऱ्यांतले एकजात सैतिक उद्यां संक्रांतीच्या मुहूर्तावर जेजुरीच्या कडेपठारावर जमायला पाहिजेत. आम्ही मागून येतों. कामाला लाग. ( गंगाराम जातो. )

**पुतळ :** ( घाईनें जवळ जाऊन ) बोलूं नये, पण बोलतें. म्हाळसा आईनं बाहेर न पडण्याची आज्ञा दिली आहे ना?

**उमाजी :** देऊं दे. मी तिची करुणा भाकीन. जिजा मला कडू बोलून गेली. उद्यांचा तिळगूळ देऊन गोड बोलण्याचा योग माझ्या जिजानं मुद्दाम आणला आहे. आमच्या भेटीच्या आड येऊं नकोस. अगदीं गप्प बैस. आणि हें बघ, जिजा कंठ्याकरितां रागावून गेली, तिच्याकरितां एक चांगलीशी मोत्याची माळ आण पाहूं काढून.

**पुतळ :** काढायला कशाला! मी देतें हो आपली. ( आपल्या गळ्यांतील माळ काढून ती उमाजीच्या गळ्यांत घालते. ) पण, धनी, आपल्यापुढं मी जास्त बोलत नाहीं; पण आपण एकटेच दिव्याला जाणार, बरोबर कुणी हत्यारबंद दहा पांच माणसं....

**उमाजी :** वेडे, मला काय करायचींत माणसं? उभ्या उभ्या जिजीला भेटून जाणार मी जेजुरीला. आणि तशीच वेळ आली, तर माझ्या गंग्याचे लोक कांहीं कमी नाहींत.

**पुतळ :** आपण कांहीं ऐकतच नाहीं. धनी, मला कशी हुरहुर लागली आहे.

[ त्याच्या खांद्यावर डोकें टेकते व रडूं लागते. ]

**उमाजी :** वेडी नाहीं तर! हा आपल्या देवाचा भंडार लाव, म्हणजे तुझं मन शांत होईल. अगदीं काळजी करूं नकोस, डोळ्याला पाणी आणूं नकोस. उभ्या उभ्या जेजुरीला जाऊन मी आलोंच म्हणून समज.

[ तिच्या कपाळाला भंडार लावून एकदम निघून जातो. ]

**पुतळ :** काय करणार या स्वभावाला? कांहीं बोलूंच देत नाहींत. लहान मूल असतं तर तोंडांत मारून गप्प बसवलं असतं. काय करणार आतां! मला तर हें चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं! 'मन चिंती तें वैरी न चिंती' म्हणतात! येऊं नयेत ते विचार माझ्या मनांत येताहेत. म्हाळसा आईनं धोक्याचा दृष्टांत धन्यांना दिलेला आहे...काळोजीला जिजाबाईंनीं वांचवलं ही गोष्ट अशा कटु काळांत अगदींच दृष्टीआड करून कसं चालेल?...जिजाबाई परवां रागोवून गेल्या...काळोजी तिकडं टपून बसला आहे...देवाच्या मनांत काय आहे कुणाला माहीत!...धन्यांना ही शंका सांगावी म्हटलं, तर बहिणीवर त्यांचा स्वतःइतका विश्वास! कांहीं असो, या पुतळला आतां ह्या वाड्यांत मुळींच स्वस्थ बसवणार नाहीं. (भिमास हांक मारते.) भिमा, भिमा!

(भिमा येते.)

**भिमा :** काय, बाईसाब?

**पुतळ :** हें पहा, स्वारीनं एकटंच दिव्याला जायचं ठरवलं आहे, आन् मला तर कांहीं सुचत नाहीं. मी निघालें तर तूं येशील ना बरोबर?

**भिमा :** हो हो! न यायला काय झालं?

**पुतळ :** ठीक तर मग. असं करूं, स्वाऱ्या निघाल्या म्हणजे अर्ध्या घटकेनं आपण गुपचुप निघूं.

**भिमा :** बरं, चला तर. (दोघीही निघून जातात.)

---

## प्रवेश पांचवा

[ **स्थळ :** दिव्यांतील जिजाबाईचें जुन्या पद्धतीचें घर. मध्यभागीं एक चौथरा असून त्याला टेकून दोन पाट आहेत. पुढें दोन चौरंग आणि त्यावर दोन थाळे व दोन तांबेभांडीं आहेत. दोन्ही बाजूंना दोन समया तेवत असून, उदबत्त्यांचा सुगंध सुटला आहे. रखमा रांगोळया घालण्यांत मग्न झालेली, असा पडदा उघडतो. पडदा वर गेल्यावर रखमा एका बाजूकडून दुसऱ्या बाजूकडे जाऊन पुन्हां रांगोळी काढूं लागते, तोंच जिजा प्रवेश करते. ]

**जिजा :** ( शांतपणें प्रवेश करून, एकदां ताटाकडे पाहते व मनःस्थितीस सांवरून ) काय ग रखमा, सर्व तयारी झाली ना ?

**रखमा :** हो, झाली. ही एवढी गुलालरांगोळीनं वेलपत्ती काढली कीं झालंच !

**जिजा :** वाः ! थाट पण थाट केलाहेस. या महिरपीचा डौल काय साधलाय् पण ! फारच छान !

**रखमा :** हो, पण आपलं कुठवर आलंय् ?

**जिजा :** माझ्याकडून अगदीं जय्यत तयारी आहे. दादाला बोटव्याची खीर फार आवडते, ती मी रांधीत होतें. केशराची पुडी तेवढी काढून दे पाहूं मला. आन् हें बघ, गाजरावांग्याच्या भाजीबरोबर कालची तीळ लावलेली बाजरीची शिळी भाकरीहि दादा मागितल्याशिवाय राहणार नाहीं. तीही त्याला वाढायची बरं का !

**रखमा :** जी. ( आंत जाऊं लागते, व पुन्हां वळून ) हो, विचारूं नये पण विचारते. आपण इतका थाट चालवला आहे, पण नायकांचं इकडं येण्याबद्दल......

**जिजा :** त्याबद्दल तूं मुळींच काळजी करूं नकोस. माझा निरोप गेला आन् दादा आला नाहीं असं कधींच नाहीं. अग, सात डोंगर ओलांडून येईल तो !

**गंगाराम :** ( धांवत प्रवेश करून ) अग येईल काय, आणला ह्या गंग्यानं मामाला.

**जिजा :** पाहिलंस रखमा ! अग माझी खात्रीच होती. गंग्या, कुठवर आलाय् रे दादा ?

**गंगाराम :** ओढ्यापर्यंत तो आणि मी बरोबरच होतों. तो हातपाय धुवायला म्हणून घोड्यावरून खालीं उतरला, आन् मी पुढं तुला सांगायला आलों.

**जिजा :** बरं, तूं आतां येशाकडून तुमच्या घोड्याला वैरणपाणी घाल. आन् रखमा, तूं त्या खिरींत तेवढी केशराची पूड टाकून थाळे तयार कर. चला, आटपा लवकर. ( रखमा व गंगाराम घाईनें निघून जातात. कांहीं वेळानें ) आतां माझं मन पूर्ण तयार झालं आहे...नव्हे, रात्रभर विचार करून मीं तें चांगलं तयार केलं आहे... पुतळ... हो तीच बया ह्याला कारण... कंठा मिळाला असता, तर आम्हीं सर्वच सुखी होत होतों. जाऊं दे, आतां दया आणि माया हे सर्व बायकी विचार मला अजिबात सोडून गेले असून स्त्रीजातीला न शोभणारं कृत्य मी आतां पार पाडणार आहें. ( विचार करून ) काय घडतंय् हें ?... चांगलं... का वाईट ? आपल्या जिजाच्या प्रेमळ हातचे जिन्नस चाखायला मिळणार, म्हणून माझा दादा ह्या पाटावर मोठ्या आनंदानं बसेल. पण रुचकर पदार्थांच्या या थाळ्याखालीं लोहशृंखला आहेत याची त्याला कल्पनाही होणार नाहीं. हो, पण दादाला पकडल्यावर सरकार त्याला मारणार तर नाहींत ना ? खरं म्हटलं तर, मी हें संकट आणीत नसून पुढंमागं त्याच्या प्राणांवर बेतणारं संकट दूर करते आहे. पण छेः ! अशा कांहींतरी विचारानं माझ्या मनाचं समाधान कसं होणार ? वाइटांतून थोडसं चांगलं काढण्याचा प्रयत्न करावा तशी माझी अवस्था झाली असून, कसं तरी मानाचं समाधान करण्याचा प्रयत्न करतें आहें. पण अशानं काय होणार?...डोकं उकलून जातंय् कीं काय !...पण पुतळ...हातावर बसलेली इंगळी...आतां कसला विचारच नको. प्रेमाची भांग प्यालेल्या जिजाऊ, आतां तुला कांहीं एक दिसतां कामा नये. मना, वज्राहून कठोर हो, आणि हातीं घेतललं काम पार पाड. ( मागें पाहून ) हो, पण हा दादा आलाच. ( पुढें होऊन ) ये, दादा, तुझ्या वाटेकडं एकसारखी डोळे लावून बसलें आहें बघ. तुझ्यावर त्या दिवशीं रागावून आलें, म्हटलं येतोस का नाहीं ? पण वेड्या मनाला वाटलं कीं, नेहमींप्रमाणं माझा दादा माझ्या बोलावण्याला आपल्याशिवाय राहणार नाहीं; आणि म्हणूनच दूधभात रांधून, थाळे तयार करून, वाट पहात बसलें आहें बघ.

**उमाजी :** जिजा, तुझ्या बोलावण्याला हा उमाजी आजपर्यंत आल्याशिवाय कधीं राहिलाय का ? आपल्या गंग्याला पाठवलंस तेव्हां मी आलों यांत कांहीं नवल नाहीं. पण तूं जरी तुझ्या गांवचं कुत्रं बोलवायला पाठवलं असतंस, तरी हा उमाजी तुझ्या हातचे दोन गोड घांस खायला आल्याशिवाय राहता ना! खरं सांगूं, जिजा ? तूं रागावून आल्यापासून या तुझ्या बंधवाला रात्रच्या रात्र झोंप नाहीं कीं अन्नही गोड लागलं नाहीं. पण तुझ्याकडून जेव्हां गंग्या मला बोलवायला आलेला पाहिला, तेव्हां जो आनंद झाला तो पोटांत मावेना, समजलीस ?

**जिजा :** हो, पण आतां अंगरखा पट्टा काढतोस ना ? खिचडी निवून जाईल. शिवाय, जेवण होतांच तुम्हांला जेजुरीला जायचं आहे ना ?

**उमाजी :** ( पट्टा सोडीत असतां ) हो तर ! जेवण होतांच निघालं पाहिजे आम्हांला. संध्याकाळपर्यंत सर्व कडेपठार माझ्या लोकांनीं भरून काढून आमच्या येण्याची वाट पहात राहील आपला भुजाबा.

**जिजा :** तर मग मी काढतें पट्टा. हत्यारापात्यारांनीं भारावलेल्या देहाचा जरा शिणवटा घालव, आन् बैस पाटावर. हातहाय धुऊन आलास ना तूं ?

**उमाजी :** ( हत्यारें व पट्टा देत ) हो, आलोंयू हातपाय धुऊन. हीं हत्यारं खुंटीला ठेव, आन् गंग्याला हांक मार. ( कट्यार कमरेला खोंचून बाकीची हत्यारें जिजा हातांत घेते. )

**जिजा :** हो, बोलावतेंच त्याला. ( जातां जातां स्वगत ) हीं हत्यारं आधीं विहिरींत फेकून देतें. म्हणजे पिंजऱ्यांत कोंडतांना हा वाघ किती जरी गरजला, तरी नखादांतांच्या अभावीं त्याला कांहींएक करतां येणार नाहीं. ( जाते. )

**उमाजी :** ( अंगरखा काढीत ) इतके दिवस मनाला जी ओढ लागली होती, ती आज नाहींशी झाली एकदाची ! जिजाच्या हट्टी स्वभावावरून वाटत होतं कीं, ती जन्मांत माझ्याशीं सरळ वागायची नाहीं. पण बहिणीचं आतडं तें ! जिजा, भावाशीं कितीही वाकडं येवो, सणावारीं बहिणीला आपल्या भावाची आठवण झाल्याशिवाय राहत नाहीं म्हणतात तें अगदीं खरं आहे हें तूं आपल्या वर्तनानं दाखवून दिलंस. ( जिजास अंगरखा देतो, तो ठेवून ती परत येते. ) ये, जिजा, आज मी तुझ्याकरतां प्रेमाची एक भेट आणली आहे. हा मल्हारीचा कंठा तुला देतां आला नाहीं तेव्हां ही मोत्याची मौल्यवान् माळ

मीं मुद्दाम पुतळकडून आणली आहे, मी स्वतः ती तुझ्या गळ्यांत घालतों.

( माळ गळ्यांत घालतो. )

**जिजा :** ( स्वगत ) दादा, माझा गळा मोत्याच्या माळेनं सजवतो आहे आणि मी त्याचा गळा —

**उमाजी :** जिजा, तुझ्या मुद्रेवरून ही माळ तुला आवडली नाहींसं दिसतं.

**जिजा :** छेः रे, दादा! इतक्या प्रेमानं तूं आणलेली ही माळ मला आवडल्याशिवाय कशी राहील? पण मी म्हणत्यें, पुतळच्या गळ्यांतली माळ कशाला आणलीस? हौसेमौजेचे तिचे दिवस आहेत, तसे माझे नाहींत.

**उमाजी :** म्हणून काय झालं? तुला ही माळ घातलीच पाहिजे.

**जिजा :** तूं म्हणतोस तर घालतें. बरं, पण आतां बसतोस ना जेवायला?

**उमाजी :** हो बसतों. जिजा, तुझ्या हातचं जेवण आज मला आईच्या हातच्या जेवणासारखं गोड लागेल. आणि, जिजा तूं माझी धाकटी बहीण असलीस म्हणून काय झालं? आपली आई हुबेहूब तुझ्यासारखी दिसायला नव्हती का? तुला पाठमोरी उभी पाहिली कीं, आपली आईच उभी आहे कीं काय, असा मला नेहमीं भास होतो. खरंच, जिजा, गेली ती थोरली आई, आणि तूं माझी धाकटी आई आहेस! आई, मला जेवायला वाढ.

( पाटावर जाऊन बसतो. )

**जिजा :** ( स्वगत ) काळोजींनीं काय व्यवस्था केली आहे कुणाला माहीत! हो, पण हें काय? दादाच्या शब्दामुळं मन पुन्हां खचूं लागलं, पण नाहीं. जिजाला आतां मन अगदीं घट्ट केलं पाहिजे. हा दृष्टीआड होईपर्यंत तेवढं वाईट वाटेल, पुढं आठवणही...

**उमाजी :** जिजा, उभी काय राहिलीस? गंग्याला हांक मारतेस ना?

**जिजा :** अरे, बोलावतेंच त्याला. ( हांक मारते ) गंग्या, गंग्या! रखमा, गंग्याला हांक मार ग! त्याला म्हणावं, मामा खोळंबून बसला आहे.

**गंगाराम :** ( धांवत प्रवेश करून ) हा मी आलोंच कीं!

( गंगाराम उमाजीजवळ पाटावर बसतो. )

**जिजा :** सगळं वाढून झालं. हं, गंग्या, मामाला बसायला सांग.

**गंगाराम :** बसायचं मामा!

**उमाजी :** ठीक पोरा. ( हातांत घांस घेऊन ) पोरा, तूंही बैस. ( जेवूं लागतात. उमाजीचा पहिलाच घांस परत येतो. उमाजी तो घांस हातांत घेऊन बसतो. )

**जिजा :** कां रे, दादा, हात का थांबला ?

**उमाजी :** जिजा, सांगितलं तर खोटं वाटेल. परवांपासून माझ्या जिवाला बरंच नाहीं बघ. जिजा, तुझ्या हातच्या अन्नानं या उमाजीचा देह आजवर अमर झाला आहे; अन्न गोड लागायचं तें...

**जिजा :** काय झालं ?

**उमाजी :** जिजा, आज कडू कां ग लागतंय् ? ( लांबून बंदुकीचा बार ऐकूं येतो. ) हां ! बंदुकीचा बार कसला ?

**जिजा :** ( स्वगत ) हं ! आले वाटतं सोजिर ! ( उघड ) अरे, बार कसला ! कुणी तरी शिकारीला आलं असेल झालं !

**उमाजी :** शिकार ! कसली शिकार ?

**जिजा :** दुसरी कसली ? वाघाची !

**उमाजी :** वाघ ? आणि ह्या दिव्याच्या शिवारांत ? माझ्या नाहीं कानावर !

**जिजा :** तुझ्या कानावर नसेल, पण एखाद्या वेळीं येतो डोंगरांतून !

( पुन्हां बंदुकीचा बार होतो. )

**उमाजी :** पुन्हां बंदुकीचा बार ! काय आहे तें पाहिलंच पाहिजे. नाहींतर या वाघाच्या ( गंगारामाकडे हात करून ) आणि ह्या चित्त्याच्या मागावर असायचं कुणीतरी. ( पुन्हां बंदुकीचा बार होतो. ) अरेच्चा ! आवाज अगदीं जवळ येऊं लागले. गंग्या, पोरा, बघ बघ, बाहेर काय गडबड आहे ती ! ( गंगाराम धांवत बाहेर जातो. पुन्हां बार होतो. ) जिजा, तूं कांहीं म्हण, पण मला हें चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं ! या उमाजीची उभी हयात स्वाऱ्या-शिकारींत गेली आहे. शिवाय, मी तुझ्या घरीं आजच आलों आहें असं नाहीं. या शिवाराला वाघ आल्याचं माझ्या कधींच ऐकिवांत नाहीं. मग आजच... जिजा, आज दैवानं कांहीं घात करण्याचा तर विचार ठरवला नाहीं ना !

( पुतळ व भिमा घाईनें प्रवेश करतात. )

**पुतळ :** घात झाला! धनी, सर्वस्वीं घात झाला!

**उमाजी :** (तांब्यांतील पाण्यानें ताटांत चटकन हात धुऊन, उभा रहात असतां) काय झालं?

**पुतळ :** आपण जेवत काय बसलांत? टोपीवाले सोजिर टेकडीमागं जंगलांत किरण साधून बसले होते. आगीचा वर्षाव करीत, ते आतां इथं येतील, आणि एका क्षणांत वाड्याला वेढा पडेल!

**गंगाराम :** (दुसऱ्या बाजूनें धांवत प्रवेश करून) पडेल कशाला? पडला! मामा, सोजिरांनीं सर्व वाटा रोखून धरल्या आणि लवकरच ते वाड्यांत शिरतील.

**उमाजी :** काय प्रसंग आला हा! मी इथं येणार याची कुणालाही वार्ता नव्हती. मग हा प्रकार झाला कसा? टोपीवाला फार झालं तर आज जेजुरीला जायचा! आणि तसा तो गेला असता, तर माझ्या लोकांच्या एकेका गोफणी-बरोबर एकेकाला घोड्यासकट लोळवलं असतं. पण टोपीवाला इथं कसा आला? मग काय दगा?

**गंगाराम**
**पुतळ** } : हो – खात्रीनं दगा!

**उमाजी :** कांहीं असो! प्रसंगाला टक्कर ही दिलीच पाहिजे. जिजा, जिजा, आटप लवकर. आधीं माझे पट्टे आण. ह्या उमाजीच्या आणि ह्या माझ्या गंग्याच्या हातांत दोन पट्टे चढून उतरूं दे आम्हां दोघांना मैदानांत! एका क्षणांत, लांडगेतोड करून एकेकाचीं शिरं अस्मानांत भिरकावून देतों. हिंमत मर्दा तो मदत खुदा! आण, जिजा, आधीं माझे पट्टे आण. (मागून दोन सैनिक येऊन उमाजीचे एकदम दंड पकडतात. उमाजी दोन्ही हातांच्या झटक्यानें त्यांना खालीं पाडतो. एका सैनिकास गंगाराम उचलतो व आंत भिरकावून देतो. परंतु, इतक्यांत अनेक सैनिक आंत घुसल्यामुळें उमाजी व गंगाराम नाइलाजानें स्वस्थ उभे राहतात. सैनिक चोहों बाजूंनीं वेढा देतात.)

**रखमा :** (उमाजी हत्यारें मागवून स्वस्थ उभा राहतो न राहतो तोंच प्रवेश करून) नाईक, ह्यांना कसले पट्टे मागतां! तुमच्या आणि गंगारामाच्या पट्ट्यां-सह घरांतील सर्व हत्यारांना जिजाबाईनीं मघाशींच जलसमाधी दिली. मी मघाशींच सांगायला येणार होतें, पण जिजाबाईनीं मला बाहेर लावून दाराला

कडी लावून घेतली. मी आतां भिंतीवरून आंत आलें. नाईक, जिजाबाईनीं, तुमच्या पाठच्या बहिणीनं, तुमचा गळा कापला हो गळा कापला!

**उमाजी :** काय? माझ्या जिजानं माझीं हत्यारं विहिरींत फेंकून माझा असा गळा कापला? जिजा, काय ऐकतों मी हें! मी माझ्या कानांवर विश्वास ठेवूं का? जिजा बोल लवकर. मी अगदीं गुप्तपणानं इथं आलों असतांना, साहेबानं डाव साधला कसा? तुझी साहेबाला मदत होती? बोल, बोल लवकर. जिजा, साहेबाला तुझी कांहीं मदत होती?

**काळोजी :** (दोन सैनिकांसह प्रवेश करून) अरे, तिची एकटीची नव्हे, तर तिच्याबरोबर या काळोजीचीही साहेबाला मदत होती, समजलास?

**उमाजी :** कोण, काळोजी?...

**काळोजी :** होय, तुझा डूक धरून बसलेला हा नागोबा...

**उमाजी :** अरेरे! उभी हयात उभी राहिली या उमाजीपुढं! काळोजी घात केलास! केवळ या उमाजीचा सूड घेण्याकरतां परक्याला मिळालास! हयातभर माझी चाकरी करून भाकरी मिळविणारा तूं हलकट कुत्ता, मी बेसावध असतांना मला डसलास! निमकहराम! स्वतःला नागोबा म्हणून घेतोस, याची तुला कांहीं शरम वाटायला हवी! काळोजी, तूं अस्सल जातीचा नागोबा तर नाहींसच, पण आईबापांचा पत्ता नसलेल्या जातींत जन्मलेला, दृष्टीस पडतांच जोड्याच्या ठोकरीनं मुसकट चेंचून टाकण्याच्या लायकीचा एक अक्करमाशा सर्प आहेस.

**काळोजी :** मी नाग असो वा सर्प असो! तुझा कडकडून चावा घेतला आहे, इतकंच मला बस्स आहे! फांशीवर टांगला जात असतांना, तुझ्या तडफडत मरणाच्या यातना मला पाहायला मिळाल्या कीं मला बस्स आहे!

**जिजा :** (कपाळावर हात मारून) काय ऐकतें मी हें! काळोजी, नीचा, दादाला जिवंत ठेवण्याचं तूं मला वचन दिलं होतंस, तें तूं विसरलास काय? अशा रीतीनं माझा उपयोग करून, दादाला मारण्याचा तुझा विचार मला आधींच कळला असता, तर बहिणीला न शोभणारं हें नीच कृत्य मीं कधींच केलं नसतं, समजलास?

**काळोजी :** माझा विचार तुला सांगण्याइतका मी मूर्ख नव्हतों. तुझ्या भाबड्या प्रेमाचा फायदा घेऊन, तुझ्या या उमाजीची नरडी आंवळण्याचा,

फांशीवर टांगला जात असतां त्याच्या तडफडत मरणाच्या यातना पाहून या माझ्या बोटांच्या यातना कमी करण्याचा माझा डाव होता.

**जिजा :** हाय रे देवा ! नीचा...( कट्यार काढून, त्याच्या अंगावर धांवते. काळोजी तिचा हात पकडतो व तिला दूर ढकलतो. )

**उमाजी :** मी जरी निःशस्त्र सांपडून मारला गेलों, तरी माझ्या मरणाचं सुख तुला लाभणार नाहीं. निमकहराम ! हा उमाजी आतां जरी पकडला गेला असला, तरी त्याची पुण्याई अद्याप संपलेली नाहीं. मनांत आणीन, तर फांशीच्या फळीवरून उडी घेऊन, तुझं नरडं मी दातानं काडकन् फोडीन. मी मरण्याच्या आधीं जर मीं तुला ठार केला नाहीं, तर माझ्या मल्हारीची सेवा मीं फुकट केली असं होऊन, माझ्या पूज्य पित्यासह माझी बेचाळीस कुळं रौरवाच्या तळाशीं कुजत पडतील !

**काळोजी :** पडतील कशाला ? तीं केव्हांच रौरवाच्या तळाशीं कुजत पडलीं असून, तूंही आपल्या बापजाद्यांच्या सहवासाला त्या नरकांत जाऊन पड. उमाजी, उगीच फुकाच्या वल्गना कशाला करतोस ? छातीवर बंदुकी रोंखल्या गेल्या आहेत. आतां हा काळोजी तुला काय, पण तुझ्या बापाचा बाप आला, तरी त्यालाही सांपडणार नाहीं.

**उमाजी :** अस्सं ! तर मग आतांच या उमाजीच्या...ह्या सिंहाच्या पंजांतून तूं आपलं रक्षण कर. ( सैनिकांच्या गराड्यांतून उमाजी काळोजीच्या छातीवर उडी घेऊन त्याचें नरडें दाबून त्याला ठार करतो. "पाजी ! हराम-खोर !" अशा तोंडानें शिव्या चालू असतात. उमाजी काळोजीच्या छातीवर बसला असतां सैनिक उमाजीवर तुटून पडून त्याला ओढतात, परंतु उमाजी काळोजीस सोडीत नाहीं. काळोजी प्रेत होऊन पडल्यावर, भिमाच्या खांद्यावर डोकें ठेवून रडत असलेल्या पुतळला भेटण्याकरतां उमाजी हात पुढें करतो. पुतळ "धनी" असा हंबरडा फोडून त्याच्या बाहूंत येऊन पडते. )

**उमाजी :** ( दुःखानें ) जिजा, जिजा, केवढा भयंकर प्रकार घडवून आणलास याची तुला कल्पना तरी आहे का ? बरोबरचा मुलगा असतांना... पण जाऊं दे ! त्या शब्दांचा उच्चार मी करणार नाहीं. जिजा, जिजा, ह्या उमाजीनं तुझ्यावर प्रेम केलं, तितकं जर एखाद्या रानच्या बाभळीवर प्रेम केलं असतं, तर बाभळीनं आपला काटेरीपणा सोडून दिला असता. स्त्रीजातीला

काळीमा फांसलास! एखाद्या नीच स्त्रीसारखं ह्या उमाजीवर कृत्रिम प्रेम केलंस! जगांतील उभ्या स्त्रीजातीला लाजेनं खालीं पाहायला लावलंस!

**गंगाराम :** मामा, या तुझ्या साध्यासुध्या बोलण्यानं काय होणार? तुझ्यावरचा आजचा हा प्रसंग पाहून, मला तर असं वाटतं कीं, माझ्या आईसारखी—तुझ्या बहिणीसारखी—हलकट स्त्री जगांतही कुठं सांपडणार नाहीं! जिजा, जिजा, तुला आई म्हणून साद घालण्याची या गंग्याला लाज वाटते. जिजा, तुझ्या कुशींत माझा जन्म झाला, त्यापेक्षां एखाद्या डुकरिणीच्या पोटीं माझा जन्म झाला असता, तर फार बरं झालं असतं! मामा, आतां काय करूं रे! हिच्या पोटीं जन्म घेतल्याचं पातक नाहींसं करण्यकरितां जीभ हांसडून प्राण देऊं, कां हें पापी शरीर अग्नींत जाळून टाकूं? मामा, काय करूं रे?

[ धांवत जाऊन, उमाजीच्या पायाला मिठी मारतो. उमाजी "गंग्या, गंग्या" असें दुःखानें म्हणून त्याच्या डोक्यावरून हात फिरवितो. ]

**पुतळ :** आतां असा संताप करण्यांत काय अर्थ? ज्याचं कृत्य त्याच्यां बरोबर! चिखलांत जन्म झाला, म्हणून मोत्याच्या शिंपल्यानं स्वतःला का बरं शिव्याशाप घ्यावे!

**जिजा :** काय ऐकतें मी हें! ही पुतळ कुणीकडं आणि मी कुणीकडं! गंगाराम, दादा, सगळा प्रकार तुम्हांला समजलाच आहे. काळोजीच्या मोहांत सांपडून, मींच हें नीच कारस्थान केलं, आणि तुमचे मोतीमोलाचे जीव फांसावर टांगले! गंगाराम, या तुझ्या आईला क्षमा कर. दादा, पाहिजे तर तूं मला ठार कर, पण या तुझ्या बहिणीला माफी दे!

**उमाजी :** नाहीं. खरं म्हटलं, तर तुला माफी देण्याचं कुणाही मानवांत सामर्थ्य नाहीं. मग माझ्यांत तरी तें कुठून असणार? तुझ्या नीच पापी कृत्याला माफी द्यायला तो माझा मल्हारीच तेवढा समर्थ आहे. जिजा, उभी हयात या उमाजीनं तुझ्यावर प्रेम केलं, मग अत्तांच ... जा, जिजा, मल्हारीच्या नांवानं मी तुला क्षमा केली आहे. तुझ्या रक्तानं मी माझे हात कशाला माखूं?

**जिजा :** माझ्या रक्तानं तूं आपले हात नको माखूंस. पण मी मात्र तुझ्या रक्तानं माखलेल्या या हातांनीं स्वतःचा शेवट करून घेतें! दादा...दादा...!

( उरांत कट्यार खुपसून घेते व मरून पडते. )

**कॅप्टन :** ( एका सैनिकासह प्रवेश करतो. सैनिकाच्या हातांत एक दोरी असते. ) ये क्या हूवा ? ( स्वगत ) खाळोजीला आणि जिजाबाईला उमाजीनें ठार खेलें ? आच्छा ! हें खाय वाईट झ्यालें नाय ! प्रषंगीं भावाछा गळा कापनारी हीं माणषें जगांटून णाहीषीं झाले, फार उटम झालें ! ( उमाजीस ) उमाजी, कंपनीसरखारच्या हुखमानें मी टूला गिरफडार केलं हाय. टूझ्यासारख्या वीराला पकडण्याछी कामगिरी माझ्यावर आली हें मी माझें भाग्य षमजटों.

**उमाजी :** या उमाजीला वीर म्हणून म्हणाऱ्या उदार वीरपुरुषा, मी तुझ्या सांपळ्यांत सांपडलों हें मीहि माझं भाग्य समजतों.

**कॅप्टन :** ऊ–माजी, टूझ्याषारख्या वीरावर अषा प्रषंग यावा, ही अट्यंट डुःखाजी गोष्ठ हाय ! अजूनही आपला हेका षोडून जीवंट रहा.

**उमाजी :** नाहीं. साहेब, तें कल्पांतीं शक्य नाहीं ! खरं पाहिलं तर तुमच्याशीं आतां माझा मुळींच द्वेष नाहीं. प्रश्न आहे तो आमच्या तेजस्वीपणाचा ! तुमच्याशीं मिळून फांशीची दोरी वाचवल्यानं मी जिवंत राहीन असं तुम्हांला वाटतं. पण, माफ करा, मला तसं वाटत नाहीं. फांशीवर चढून दिमाखानं मरण्यानंच मी माझ्या लोकांत जिवंत राहणार आहें. साहेब, मला आग्रह करूं नका. ( जिजा मरून पडतांच, गंगाराम तिच्या वक्षःस्थळावर डोकं टेंकून शोक करीत असतो त्यास ) गंगाराम, शोक आंवर, शोक आंवर.

**गंगाराम :** मामा, जिजाला अशा तऱ्हेनं मृत्यु आला, त्यापेक्षां आधींच ती अपघातानं मेली असती तर फार बरं झालं असतं ! मल्हारीच्या मनांत... पण नको, आतां मल्हारीचं नांव तरी कशाला घ्यायचं ! त्यानं आमच्यावर असा कोणचा चांगला प्रसंग आणला आहे म्हणून त्याचं आम्ही नांव घ्यावं ! ( पुन्हां डोकें टेंकतो. )

**उमाजी :** छेः छेः ! गंग्या, असं बोलूं नकोस ! वाटेल तसला बिकट प्रसंग हा उमाजी सहन करील, पण मल्हारीबद्दल असे उद्‌गार तो कधींही सहन करणार नाहीं. अरे, माझ्या देवाला, माझ्या जेजुरीच्या राजाला कां दोष ? माझ्या मल्हारीनंच मला दीनांचा पालनहार बनवलं. माझ्या मल्हारीनंच मला अलोट संपत्ति दिली. मल्हारीनं सर्व कांहीं दिलं. मी जर आज माझ्या राजाच्या हुकुमाप्रमाणं वागलों असतो, तर हा प्रसंग माझ्यावर कशाला आला असता ? जेजुरीला जायचं सोडून मी इथें एकटा आलों, माझ्या आईचं मीं

ऐकलं नाहीं ही माझी चूक; माझ्या मल्हारीची चूक नाहीं. आन् मी म्हणतों, मला आतां मृत्यु आला म्हणून काय बिघडलं? पारध्याच्या बाणाच्या निमित्तानं प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्णदेवाला मृत्यु आलाच कीं नाहीं! गंगाराम, देव कधीं चुकत नाहीं, मनुष्य चुकत असतो.

**पुतळ :** धनी, आपलं म्हणणं खरं आहे! म्हाळसाआईच्या ग्वाहीनं, मीं आपल्याला इकडं येण्याला अडथळा केला, पण आपण ऐकलं नाहीं आणि असे फशीं पडलांत. राजे, येऊं नयेत ते विचार मनांत येतात. धनी, आतां आपलं काय होणार!

**उमाजी :** काय होणार, काय होणार! पुतळ, तें या मुखानं कशाला ऐकतेस? निकाल ठरलेला आहे. कंपनीसरकारला मी हजार वेळां सतावलं आहे, त्याचा मोबदला मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. आणि त्याची मला फिकीरही नाहीं. तसं म्हणशील तर सरकारबद्दल मला आतां कांहींच वाटत नाहीं. या साहेबाकडं कांहींच दोष नाहीं. मला जो संताप येतो तो ह्या आमच्या हलकट विश्वासघातकी आणि नेभळ्या लोकांचा. पण जाऊं दे. बोलूं नये तें बोलून गेलों. पुतळ, ही पहा माझी फांशीची दोरी.

(सैनिकाच्या हातांतील दोरीकडे बोट दाखवतो.)

**पुतळ :** काय? आपल्याला फांशी होणार? धनी, नुकता कुठं मांडलेला खेळ आपण इतक्या लवकर संपवणार? धनी, अंगाला लावलेली ओली हळदही अजून वाळली नाहीं हो! क्षणभर नजरबंदी करून, पुतळला भारून...हिला सोडून आपण निघून जाणार?

**उमाजी :** पुतळ, आतां असं बोलून ह्या जात्या जीवाला कां ओढ लावतेस? आणि मी गेलों, म्हणून तुला कायमचा का अंतरणार आहे? माझ्या मल्हारीनंच हा खेळ आवरण्याची मला आज्ञा केली आहे. त्याच्या पायाशीं मी स्वस्थ विश्रांती घेत बसणार आहें! योग्य वेळीं तूंही तिथं ये, म्हणजे कधींही न मोडला जाणारा संसार आपण आरंभूं, मग तर झालं ना?

**पुतळ :** धनी, काय झालं हें! सगळं स्वप्नवत् ठरलं! नाहीं, माझ्याच्यानं हा विरह सहन होणार नाहीं!

**उमाजी :** सहन केला पाहिजे! हयातभर मृत्यूशीं झगडणारे आपण ऐनवेळीं हातपाय गाळून कसं चालेल? ही पहा, फांशीची दोरी स्वतःच्या हातानं मी

माझ्या गळ्यांत अडकवून घेतों. ( पुतळला दूर ढकलून सैनिकाच्या हातांतील दोरी घेतो व तिचा फांस गळ्यांत घालतो. )

**पुतळ :** ( एकदम मिठी मारून ) आपण निघालांत !

**उमाजी :** हो, निघालों, निघालों. पण इथून जाण्यापूर्वी एक जिव्हाळ्याचा निरोप जगाला ओरडून सांगितल्याशिवाय माझ्याच्यानं राहवत नाहीं ! काय सांगूं? ह्या उमाजीनं जिजावर—आपल्या बहिणीवर जिवापलीकडं प्रेम केलं. पण जिजाचं—माझ्या बहिणीचं माझ्यावर मुळींच प्रेम नव्हतं. या उमाजीला जगांत मुळीं बहीणच नव्हती ! ज्या कुणी मावल्या आपल्या भावावर निःस्वार्थी प्रेम करणाऱ्या असतील त्यांनाच बहिणी मानून, हा उमाजी शेवटचा दंडवत घालतों आहें. माझ्या मल्हारीमार्तंडा, श्रीशंभु महादेवा, ह्या उमाजीला आतां जर कांहीं कामगिरी सांगायची असेल, तर ती या विश्वासघातकी, पाजी जगांत सांगूं नका ! एका जातीनं दुसऱ्या जातीवर, मुलानं बापावर, मित्रानं मित्रावर, आणि भावानं बहिणीवर, जिथं विश्वास ठेवण्याची सोय नाहीं तिथं कुणाही प्राण्याला स्वपराक्रमानं जिवंत राहतां येणं शक्य नाहीं. माझा मायदेश जोंपर्यंत असल्या नीच वृत्तीनं भरला आहे तोंपर्यंत, शंकरा, मला जन्माला घालूं नका ! आपल्या पायाशीं कैलास शिखरावर आश्रय द्या ! माझ्या जिवाला जीव देणाऱ्या सवंगड्यांनो, या उमाजीचा शेवटचा रामराम घ्या !

**कॅप्टन :** माय लॉर्ड ! व्हॉट ए थ्रिलिंग ट्रॅजेडी ! इट्स् द् बेस्ट ऑफ टाइम्स् ! इट्स् द् वर्स्ट ऑफ टाइम्स् ! ऊ—माजी टूझें चरिट्र लिहूण ठेवण्याछ्या योग्यठेचा टूं हायेष यांट शंका नाय ! डोस्ठा, प्राणदाण टर टूं मागट नाहींषच. पण, टुझी शेवटछी काय इच्छा अषेल टर टी पुरी खरायला मी टयार हाय !

**उमाजी :** साहेब, तुम्ही किती थोर आहांत ! प्राणदान तर मी मागणार नाहींच. पण, तुम्ही जर कांहीं देणार असाल, तर माझ्या प्रणाहून प्रिय असलेला माझ्या मल्हारी...मल्हारी...मल्हारीकरतां योजलेला हा कंठा त्याच्या चरणांवर वाहण्याची मला परवानगी द्या !

**कॅप्टन :** बहोट आच्छा !

**उमाजी :** पुतळ, सोड तो कंठा आणि गंगारामजवळ दे !

( पुतळ कंठा सोडते व गंगारामजवळ देते. )

**पुतळ :** ( दुःखातिरेकानें हंबरडा फोडून उमाजीस मिठी मारते. ) धनी....

**उमाजी :** पुतळ, येतों मी ! जिवाला जप. संभाळून रहा. ( मिठी सोडून तिच्याकडे पहात जाऊं लागतो. )

**पुतळ :** धनी, आतां काय संभाळायचं ? ही पहा मी आपल्या पुढं झालें. "जय येळकोट मल्हार !" ( कमरेचा खंजीर काढून स्वतःच्या छातींत खुपसते व मरून पडते. ती जयजयकार करीत असतां उमाजीही जयजयकार करतो. पडदा पडतो. )



## रंगभूमीवर सर्वत्र गाजलेलीं नाटकें

| | | |
|---|---|---|
| संत सखाराम | वसंत दुद्वडकर | १॥ रु. |
| कुटुंब | ,, | १॥ रु. |
| संग्राम | ,, | १॥ रु. |
| सोन्याचा संसार | ,, | १॥ रु. |
| माझा गांव | ,, | १॥ रु. |
| माझं लग्न (विनोदी) | ,, | १॥ रु. |
| श्रीमंत | ,, | १॥ रु. |
| बुद्धिभेद | ला. कृ. आयरे | १॥ रु. |
| पोटचा गोळा | शिवलकर | १॥ रु. |
| अन्नदाता | ,, | १॥ रु. |
| निराधार | ,, | १॥ रु. |
| नवा संसार | वसंत जाधव | १॥ रु. |
| प्राणाचं दान | ,, | १॥ रु. |
| तुफान | तोडणकर | १॥ रु. |
| ४२ चें आंदोलन | कॅ. शिंदे | १॥ रु. |
| गुंतागुंत अर्थात दोरीचा साप | ,, | १॥ रु. |
| बाईलवेडा | कै. फाटकशास्त्री | १। रु. |
| म्युनिसिपालिटी | माधवराव जोशी | १॥ रु. |
| वऱ्हाडचा पाटील | ,, | १॥। रु. |
| जानकी | ना. सी. फडके | १॥ रु. |
| म्हातारपणचे डोहाळे | आठवले | १। रु. |
| बहीणभाऊ | नानासाहेब गोखले | १ रु. |
| कन्यादान | मो. ग. रांगणेकर | १। रु. |
| तुझं माझं जमेना | ,, | ·॥। रु. |
| सतरा वर्षें | ,, | ·॥। रु. |
| फरारी | ,, | ·॥। रु. |
| येथें नवरे मिळतात (पुरुषपात्रांशिवाय) | ,, | ·॥। रु. |